आंतरभारतीय पुस्तकमाला

# नव्या जगाला प्रणाम

## (एक रूपक काव्य)

अली सरदार जाफरी

अनुवाद

श्रीपाद जोशी




नॅशनल बुक ट्रस्ट, इंडिया

# भूमिका

नव्या जगाला प्रणाम ' हे माझे सर्वांत मोठे दीर्घकाव्य आहे. उर्दू भाषेत अशा प्रकारचे दीर्घकाव्य आजवर कोणीही लिहिलेले नाही. त्यामुळे हे काव्य प्रस्तुत करताना मला थोडा संकोच होत आहे. या संकोचाचे कारण आत्मविश्वासाचा अभाव हे नसून कवितेचे नावीन्य हे आहे. आपल्या समाजात प्रत्येक नव्या गोष्टी-कडे साशंक नजरेने पाहिले जाते. या काव्याचा विषयही नवा आहे आणि त्याचे तंत्रही नवे आहे. जीवनासंबंधीचा माझा दृष्टिकोणही इतर कवींपेक्षा वेगळा आहे. म्हणून मी बहुतेक ठिकाणी संकेतांऐवजी स्पष्टीकरणांचा वापर केला आहे. पुढेमागे संकेत किंवा रूपके यांचा वापर करता येण्यासारखी परिस्थिती अवश्य निर्माण होईल.

हे पद्यबद्ध रूपक नसून रूपकात्मक काव्य आहे. यातील पात्रे ही पात्रे नसून प्रतीके आहेत. कथेमध्ये कथावस्तू नसून तो एक अस्पष्ट आराखडा आहे. त्यात रंग भरण्यासाठी मी तो तयार केला आहे. घटनांच्या ऐवजी घटनांतून निर्माण होणाऱ्या भाव-भावना, प्रभाव व जाणिवा प्रस्तुत करण्यात आल्या आहेत. जावेद व मरियम ( पति-पत्नी ) संघर्षाची प्रतीके असून फिरंगी हे अत्याचाराचे प्रतीक आहे. जासूद किंवा निरोप्या हे आपले परंपरागत पात्र आहे. त्याची कर्तव्ये या कवितेत बदलली असल्याचे दिसून येईल. सर्वांत महत्त्वाचे पात्र म्हणजे अजून ज्याचा जन्म झालेला नाही असे बालक हे आहे. अजून ते आकार धारण करीत आहे. ते नव्या जगाचे प्रतीक आहे. त्याचा सुंदर व निरागस आत्मा संपूर्ण काव्याला व्यापून राहिला आहे.

मानवाच्या भवितव्याविषयी मी निराश नाही. त्याचा भूतकाळ अत्यंत दिव्य-भव्य आहे; आणि वर्तमानकाळ आकर्षक संभाव्यतांनी भरलेला आहे. आज हिंदुस्थानला यादवी युद्धाच्या वेदना सहन कराव्या लागत आहेत आणि रानटीपणाच्या युगातील जीवनानेही शरमेने मान खाली घालावी असल्या जंगली घटना सध्या घडत आहेत हे खरे; तरी पण प्लेग व पटकीच्या साथींप्रमाणे ही साथही निघून जाईल. कारण माझ्या काव्यात ज्या शक्ती कार्य करताना दिसतात त्याच शक्ती या साथीं-विरुद्धही संघर्ष करीत आहेत.

# भूमिका

जगाच्या इतिहासात ' मानवा 'चा पराभव झाला आहे असा कालखंड कधीच निर्माण झालेला नाही. व्यक्ती व वर्ग यांचा पराभव होत आला आहे आणि तो होत राहीलही; पण ' मानव ' हा अपराजेय आहे; कारण त्याचे परिश्रम, कार्य व संघर्ष यातून केवळ त्याची जाणीवच घडत असते असे नाही तर बऱ्याच प्रमाणात त्याच्या वातावरणाची निर्मितीही त्यातून होत असते. म्हणून तो सदैव विजयी व यशस्वी राहील. हा विश्वास केवळ अंधविश्वास नाही. ती माझी सर्वांत मोठी प्रेरणा आहे. तो साहित्य व कला यांचा अनादि विषय आहे असे मी मानतो. सर्वांत अधिक भव्य-दिव्य, सर्वांत अधिक सन्माननीय व सर्वांत अधिक सुंदर ' मानव 'च आहे.

**सरदार जाफरी**

# नवी कविता आणि ‘ नव्या जगाला प्रणाम ’

**( लेखक : मिर्जा जाफर अली खान, ‘ असर ’ लखनवी )**

सरदार जाफरीसाहेबांचे दीर्घ रूपक वाचून मला अत्यंत आनंद झाला. त्याचबरोबर माझ्या या विचारालाही त्याने बळकटी मिळाली, की कविता नवी असो की जुनी असो, ती प्रथम एक कला आहे आणि मग दुसरे काही आहे. काव्यविषयाच्या उपयुक्ततावादी अथवा सौंदर्यविषयक पैलूंचा विचार बाजूस ठेवल्यानंतर वर्णनशैलीत ताजेपणा, टवटवीतपणा, नावीन्य आणि कलावंताचे व्यक्तिमत्त्व, म्हणजेच स्वत: कवीच्या संकोचशील प्रभावांचे प्रतिबिंब, या गोष्टी कवितेत नसतील तर ती कविता म्हणजे अगदीच खालच्या दर्जाची निव्वळ नक्कल बनते. या काव्याच्या लेखकाला ही गुरुकिल्ली अवगत आहे; आणि म्हणून त्याने आपल्या कवितेत घटनाच्या ऐवजी घटनांमधून निर्माण होणाऱ्या भाव-भावना, प्रभाव व जाणिवा प्रस्तुत केल्या आहेत. ज्या काव्यात संदिग्धता व अर्थहीनता ही अंतर्मनाच्या हालचालींच्या किंवा प्रवृत्तींच्या नावाखाली लपविण्याचा प्रयत्न केला जातो अशा सांकेतिक कवितेपासून जाफरीसाहेब अलिप्त राहिले आहेत, याबद्दल त्यांचे अभिनंदन केले पाहिजे. त्यांनी संकेतांऐवजी विस्तार व स्पष्टीकरण यांचा उपयोग केला आहे; आणि आपल्या ‘ भूमिके ’त ही गोष्ट त्यांनी स्पष्टपणे सांगूनही टाकली आहे. हे उद्दिष्ट डोळ्यांसमोर असल्यामुळे जाफरीसाहेबांनी या रूपकातील पात्रांची संख्याही लहान ठेवली आहे.

जावेद आणि मरियम ( पति-पत्नी ) ही स्वातंत्र्यलढ्याची प्रतीके आहेत. फिरंगी हे जुलुमाचे प्रतीक आहे. जासूद हा पारंपरिक निरोप्या आहे. अजून जन्मास न आलेले बालक भावी पिढीचे प्रतिनिधित्व करते. विषयाचा विचार करता या काव्याला ‘ साम्यवादाचे संग्रामगीत ’ असे म्हटल्यास वावगे होणार नाही. त्याने उर्दू काव्यात मोलाची भर पडली आहे.

काव्यातील प्रकरणांची विभागणी पुढीलप्रमाणे करण्यात आली आहे :

**उपोद्घात** : या प्रकरणात हिंदुस्थानातील दु:ख, दारिद्र्य व दास्य यांचा कालखंड म्हणजे एक भीषण काळोखी रात्र किंवा भयंकर राक्षसीण आहे अशा स्वरूपात तो प्रस्तुत करण्यात आला आहे. या काळोखाचा पडदा फाडून टाकण्या-

साठी क्रांतीची जरूर आहे. ज्या क्रांतीची प्रेरणा मानवाच्या सदसद्विवेकबुद्धीतील प्रकाशमानता असेल अशी ही क्रांती हवी. तिचे उद्दिष्ट केवळ माथेफिरूपणाने करावयाचा विध्वंस हे नसून नवी समाजरचना घडवून आणणे हे आहे. या समाज-रचनेचा आराखडा भविष्यकाळावर सोपवून दिलेला नसून तो मनात तयार आहे.

**पहिले दृश्य** : अंधारातून दोन आकृत्या दिसू लागतात. त्या क्रांतीच्या पाईक आहेत. त्यातील एक पुरुष असून दुसरी स्त्री आहे. स्त्री-पुरुषांच्या एकत्रित व संयुक्त प्रयत्नांतूनच संपूर्ण स्वातंत्र्य व सुखसमृद्धी प्राप्त होऊ शकते, ही गोष्ट यातून सूचित होते. झांशीच्या राणीच्या आत्म्याला स्त्रीच्या कर्तबगारीचा प्रतिनिधी बनविण्यात आले आहे. घुसमटलेले वातावरण व दुःखपूर्ण विषय यांमध्ये रंगेलपणा व शृंगार यांचा थोडा आभास निर्माण करण्यासाठी आणि क्रांतीच्या समर्थकांमध्ये नैतिकदृष्टचाही मानवता व त्यागभावना यांचे साक्षात् दर्शन घडले पाहिजे यासाठी जावेद व मरियम यांच्यातील प्रीतीचे व मीलनाचे वर्णन करण्यात आले आहे. त्यांचा प्रणय पावित्र्यपूर्ण आहे. सामान्यतः पुरोगामी मंडळींना असली प्रीती पसंत नसते; किंबहुना त्यांना नागडाउघडा रोमान्सच हवा असतो. मग तो कितीही अल्पजीवी, पलायनवादी व परिणामी हानिकारक का असेना ! मरियम ही शील व पातिव्रत्य यांची मूर्ती आहे. जावेदचा प्रीती ही कामवासनेचा भट्टी नसून तिची पाळेमुळे आत्म्याच्या विस्तारामध्ये पसरलेली आहेत; आणि आत्मिकतेतूनच तिला अभिव्यक्तीची प्रेरणा मिळते.

**दुसरे दृश्य** : मरियम व जावेद यांच्यात वैवाहिक नाते जोडले गेले आहे; आणि मरियम ही 'एका शरीरात दोन जीव' या अवस्थेत आहे. या स्थितीचे व तिच्याशी संबंधित भावनांचे चित्रण जाफरीसाहेबांनी इतक्या हळुवारपणे व कौशल्याने केले आहे की, त्याला 'अप्रतिम' हेच विशेषण लावता येईल. उर्दू साहित्यात तर ती अगदी नवी गोष्ट आहे.

**तिसरे दृश्य** : दातांवर मारायला फुटकी कवडीही जवळ नसलेली मरियम आपल्या भावी मुलासाठी आंगडे शिवीत आहे. त्यासाठी लागणारे कापड नसल्यामुळे चिंध्या-चिरगुटे जोडून ती काम भागवीत आहे. त्यातही आईची ममता अशी विचित्र की, वेगवेगळ्या रंगांच्या तुकड्यांमध्ये रंगसंगती कशी साधता येईल याच्याच विचारात ती मग्न आहे.

**चौथे दृश्य** : क्रांतीची लक्षणे दिसू लागली आहेत. जावेद व मरियम त्या चळवळीच्या आघाडीवर आहेत. सरकारविरुद्ध बंड केल्याच्या आरोपावरून त्या दोघांना

फिरंगी न्यायालयासमोर उभे करण्यात येते. न्यायाधीशाने विचारलेले प्रश्न, जावेद व मरियम यांनी त्यांना दिलेली उत्तरे, त्यांच्या चेहऱ्यांवरील हावभाव, त्यांच्या वाणीतील चढउतार या सर्वांच्या वर्णनांनी काव्याचा हा भाग ओजस्वी बनला आहे. जावेद व मरियम यांची जबानी व्यक्तिगत द्वेष, घृणा, वैर, शत्रुत्व यांपासून पूर्णपणे मुक्त आहे. त्यांचा लढा एका विशिष्ट राज्यव्यवस्थेविरुद्ध, एका खास संस्कृतीविरुद्ध आहे. ही राज्यव्यवस्था व संस्कृती जुलूम व अत्याचार यांच्या पायावर उभारलेली असून, तिच्यातील संपत्तीचे विभाजन विषमपणे व अन्याय्य पद्धतीने झालेले आहे. तेथे गरीब पायदळी तुडवले जातात आणि त्यांचे न्याय्य हक्क ठोकरले जातात. या संग्रामात वैयक्तिक वैमनस्याला मुळीच स्थान नाही.

जावेद बंडखोर ठरतो आणि त्याला मृत्युदंडाची शिक्षा सुनावली जाते. मरियमला बाह्यत: सोडून देण्यात येते. परंतु तिला मृत्युदंडापेक्षाही भयंकर शिक्षा मिळते. "जन्मभर नुसती रडत बैस!"

**पाचवे दृश्य** : फासावर चढण्यापूर्वी जावेद लौकर नवी प्रभात होणार असल्याची भविष्यवाणी करतो; किंबहुना तसा शुभसंदेश देतो. या खंडातील काव्य अनेक ठिकाणी फार महत्त्वाचे आहे. येथे त्याचा सविस्तरपणे परामर्श घेता येणार नाही.

**सहावे दृश्य** : मरियम ही किती झाले तरी स्त्रीच आहे. ती विलाप करते. जामूद तिला जावेदचा शेवटचा निरोप सांगतो. या निरोपात या साऱ्या काव्याचे सार आलेले आहे. त्यात भावनांचा पूर दुथडी वाहात आहे.

**उपसंहार** : नव्या क्षितिजावरून नवे काफिले येत आहेत
कालरूपी दिव्याची रंगीन ज्योत त्यांनी मोठी केली आहे
देशासाठी लढणाऱ्या हे योद्धयांनो, पुढे पुढे चालत राहा
होय, हे देशभक्त योद्धयांनो, पुढे पुढे चालत राहा

कवितेचे जे बाह्य स्वरूप जाफरीसाहेबांनी स्वीकारलेले आहे तेही आकर्षक व नादमाधुर्याने भरलेले आहे. जरूर तेथे त्यांनी मुक्तछंदाचाही वापर केला आहे. परंतु त्यांनी छंदाचा त्याग केलेला नाही. त्यावरून त्यांना छंद:शास्त्र पुरेपूर अवगत असल्याचे जसे दिसून येते तसेच त्यांचे भाषेवरील प्रभुत्वही नजरेत भरते. उपोद्घातातील शेर यमक व अनुप्रास यांचे नियम पाळून लिहिलेले आहेत. फक्त शेवटच्या शेरात थोडा बदल आढळून येतो. हा शेर म्हणजे पहिल्या दृश्याची भूमिका किंवा या काव्याचे ध्रुपद आहे, असे म्हणता येईल.

उपोद्घातात ज्या वृत्ताचा व यमकांचा वापर करण्यात आला आहे त्याच

वृत्ताचा व यमकांचा वापर उपसंहारातही करण्यात आला आहे. गीतामध्ये ताल व सम असते तसे हे आहे. पहिले दृश्य उर्दूतील मसनवी या काव्यप्रकारात मोडणारे आहे. गायक आपल्या बोटातील नखीने हातातील स्वरमंडळ छेडून आपल्या गायनाला साथ मिळवतो, तशा तऱ्हेचे वातावरण या मसनवीने तयार होते. जे वृत्त व जी यमके उपोद्घातात व उपसंहार यात वापरण्यात आली आहेत तीच दुसऱ्या दृश्यातील एका भागात वापरली गेली आहेत. जणू गीत गाण्यापूर्वी त्याचा सूर व लय ही निश्चित करण्यात आली आहेत. बाकीचा भाग पहिल्या दृश्याप्रमाणे मसनवीच्या चरणांनी त्याच वृत्तात गुंफला आहे. गवयाने कंठातून जे गीत गायिले आहे किंवा तो गाणार आहे, तेच गीत तो आपल्या वाद्यावर वाजवीत आहे. तिसऱ्या दृश्यातील एका भागात पंचपदीचा वापर करण्यात आला आहे ( गीताची लय वाढते ). त्यामध्ये एकच शेर पुन:पुन्हा वापरण्यात आला आहे. जणू गायक वेगवेगळे मार्ग शोधून काढतो आहे, बोल-आलाप घेत आहे, तानेच्या जागा निश्चित करीत आहे. इतर भागांतील पहिले दोन शेर वेगवेगळ्या वृत्तांत यमक व अनुप्रास यांचे नियम पाळून रचलेले आहेत. जणू गायक सुरांचा कानोसा घेत आहे. त्यानंतर कवितेने मुक्तछंदाचे रूप धारण केले आहे. याला संगीताच्या परिभाषेत 'तानपलटे' असे म्हणता येईल. या दृश्याचा अधिकांश भाग निबंधात्मक असल्यामुळे वृत्ताची निवड, चरणांचा क्रम, त्यांच्या संख्येतील कमीजास्तपणा यांवरून जाफरीसाहेबांच्या कलात्मक जाणिवेची चांगली कल्पना येते. त्याला रागाचे सरगम किंवा ध्रुपद म्हणता येईल. चौथ्या दृश्यातील एक भाग म्हणजे दोनदोन शेरांच्या तुकड्यांचा समूह आहे. त्याला संगीतातील 'ठाय' म्हणता येईल. इतर भाग मुक्तछंदात आहे. पाचव्या दृश्यात चार चार चरणांचे श्लोक असून त्यातील पहिल्या, दुसऱ्या व चौथ्या चरणांची यमके जुळलेली आहेत. त्याला संगीतातील 'फिरत' म्हणता येईल. त्यानंतरचा भाग मुक्तछंदात आहे. परंतु त्यात काही काही ठिकाणी यमके जुळली आहेत. कोठे विलंबित लय आहे तर कोठे द्रुत लय. कोठे मध्यम आहे तर कोठे पंचम. सहाव्या दृश्यात प्रारंभी मसनवी ढंगाचा वापर केला आहे. नंतर मुक्तछंद येतो. आणि मग पुन्हा मसनवी. जणू जेथून राग सुरू झाला होता तेथेच क्रमाक्रमाने परत येऊन किंचित कंपनांसह तारा झंकारतात आणि राग समाप्त होतो. या संदर्भात मी माझा एक शेर उद्धृत करणे धाष्टर्याचे होईल. तरी पण तसे करण्यास वाचकांनी मला परवानगी द्यावी :

हे गायका, तू असे गीत ऐकविलेस
की जणू त्याची शिरशिरी माझ्या सर्वांगात व्यापून राहिली आहे.

या काव्याची रचना व विविध छंद यांची कल्पना कवीला श्री. जोश यांच्या 'हर्फे आखिर' या संपादन चालू असलेल्या संग्रहावरून सुचली असल्यास आश्चर्य नाही. या काव्यातील 'हर्फे आखिर' ( उपसंहार ) या प्रकरणावरून तसे स्पष्ट दिसते. अर्थात् एवढा फरक अवश्य आहे की ( माझ्या माहितीप्रमाणे ), जोश मुक्त-छंदाच्या विरुद्ध आहेत. असेही म्हणण्याचे धाडस करावेसे वाटते की, एकाच छंदातील एखादे दीर्घ काव्य वाचताना कंटाळा येऊ नये एवढ्याच मर्यादेपर्यंत वेगवेगळ्या छंदांचा वा वृत्तांचा वापर योग्य आहे असे जोशसाहेबांना वाटते. जाफरीसाहेबांच्या बाबतीत छंदांची निवड , चरणांचा क्रम, त्यांची लांबीरुंदी , आकृतिबंधातील अंतर्गत बदल या साऱ्या गोष्टी विशिष्ट हेतूने करण्यात आलेल्या आहेत. तो हेतू असा की, छंदाचे वैविध्य, चरणांची संख्या कमीअधिक करणे, सुरातील चढउतार यांमुळे गीताच्या लाटांमध्ये हालचाल निर्माण व्हावी व त्यातून तुफानी वातावरण निर्माण व्हावे; कारण तुफान अथवा वादळ हे क्रांतीचेच दुसरे नाव आहे. त्यासाठी त्यांनी जाणूनबुजून अथवा अजाणता ( प्रतिभा व स्फूर्ती यांच्या मार्गदर्शनाने ) अशा छंदांची निवड केली आहे, की ज्यायोगे छंदोवैचित्र्य असूनही एकसंधपणा किंवा एकात्मता राहिली आहे. उदाहरणार्थ :

"काळा न्याय काळे तुरे खोवून बसला आहे"
"पाणी, माती व वारा यांचे हे जग फार सुंदर आहे"
"जग म्हणजे विस्कटलेल्या स्वप्नांची वस्ती आहे"
"आणि दर्ज्यातील फरकांनी बेजार आहे"
"घोषणांनी दऱ्याखोरी दुमदुमली आहेत"

यमकांचे काटेकोर पालन व त्यांचे उल्लंघन , छंदातील बदल, चरणांची संख्या कमीजास्त करणे या सर्वांमुळे या शैलीला चांगली बळकटी आली आहे.संगीताच्या परिभाषेत हीच गोष्ट पुढील शब्दांत सांगता येईल :

राग सुरू झाला. गीताच्या सपाट लहरींमध्ये कंपने उत्पन्न झाली. त्या कंपनातून किंचितशा सुरकुत्या पडू लागल्या. त्या सुरकुत्या पसरत पसरत व वाढत वाढत वर्तुळे बनवू लागल्या. त्यातून आंदोलने निर्माण झाली व ही वर्तुळे झोके घेऊ लागली. लहान-मोठ्या लहरी एकमेकींवर आदळू लागल्या. आदळून दूर गेल्या व दूर जाऊन पुन्हा एकमेकींत मिसळल्या. त्यांनी दुसऱ्यांना चिंब भिजविले व आपण स्वतः चिंब भिजल्या. त्याचबरोबर गीताची हालचाल व लय वाढत गेली. तरी पण त्याची रचना व त्याचे वजन कायम राहिले. प्रमाणबद्धता व रागाची बांधणी यात फरक पडला नाही. आणि

त्याचा शेवट अशा एका परमोच्च जागी झाला, की तेथून पुढे गेल्यास गाणे हे निव्वळ रेकणे बनते आणि क्रम गोंधळात परिवर्तित होतो.

मी या काव्याच्या प्रत्येक विभागावर जे संक्षिप्त भाष्य केले आहे त्यावरूनही या विचाराला पुष्टी मिळते. खंडकाव्यात एक प्रकारची क्रमबद्धता असते. याला पुरावा म्हणून उदाहरणे देणे कठीण आहे. त्याचे मुख्य कारण असे की, ही उदाहरणे एवढी लांबलचक असतील की ती या लेखात सामावू शकणार नाहीत. परंतु हे काव्य संपूर्ण लक्षपूर्वक वाचल्यास माझा हा मुद्दा चुकीचा नसल्याचे वाचकांना पटेल.

आकृतिबंध व रचना यांखेरीज हे काव्य काव्यात्मतेनेही पुरेपूर नटलेले आहे. त्याची काही थोडीच उदाहरणे मी देतो. तसे पाहिल्यास हे काव्य खूपच विस्तृत असूनही सुरुवातीपासून अखेरपर्यंत सुंदर आहे

काळ्या रंगाचे झेंडे वाऱ्यावर फडफडत आहेत
काळोखी रात्र डोके वर काढून उभी आहे
काळ्या बटांशी काळे साप बिलगलेले आहेत
त्यांच्या काळ्या फणा म्हणजे हसरी काळी फुले आहेत.

केसांच्या बटांना सापांची उपमा ही अगदी शिळी झालेली गोष्ट आहे; परंतु सापाच्या फण्याला काळे फूल म्हणण्यात नावीन्य व अभिनवता आहे. त्या फुलांना हसरी फुले म्हणण्याचे कारण असे की, इकडे काळेभोर केस चमकत आहेत तर तिकडे सापाच्या फण्यावरील ठिपके व टकमक टकमक पाहाणारे डोळे आहेत. केसांप्रमाणे सापाची कातही चमकदार असते. या दृश्यावर अंधाराचे सावट पसरले असल्यामुळे केसांचा चमकदारपणा अंधुक होऊन पाण्यावर पडलेल्या तेलाच्या तुळतुळीत वर्तुळांचा आभास निर्माण करीत आहे; आणि सापाच्या फण्यावरील पांढरे ठिपके ताऱ्यांप्रमाणे लुकलुकत आहेत. त्यांनाच कवीने काळ्या फुलांच्या स्मिताची उपमा दिली आहे.

काळ्या ओठांवरील काळ्या चुंबनांच्या खुणा
काळ्या खुशीतील झिंग चोरण्याचा प्रयत्न करीत आहेत

झिंग चोरणे ' या शब्दांचा वापर म्हणजे शब्दांची अत्यंत कलात्मक निवड होय. काळ्या ओठांवर काळ्या चुंबनाचे काळेनिळे डाग पडले आहेत. या डागांवर तांबूस-निळसर झाक असणे आवश्यक आहे. मद्यपानाचा अतिरेक व अत्यधिक कामातुरता यांमुळेही चेहऱ्यावरील लालीत काळसर छटा मिसळलेली दिसते. काळ्या रंगातील लाल रंगाची छटा ही निर्लज्जपणे भीक मागून मिळविलेली नाही तर ती

चोरलेली आहे. ज्या ओठांमध्ये गुलाबपुष्पाच्या ओलसर पाकळीचा नाजुकपणा व टवटवीतपणा असावयास हवा त्या ओठांना ही काळ्या रंगातील लालसर छटा किती तिरस्करणीय बनवून टाकते ! जाफरीसाहेब आपल्या समव्यावसायिकांप्रमाणे पाप व दुराचार यांना पावित्र्य व सौंदर्य यांचे मुखवटे चढवून प्रस्तुत करीत नाहीत, याचा मला आनंद होतो.

ओठांवर चुंबनांच्या खुणा मागे उरतात, याचाच अर्थ असा की, त्या चुंबनांचा प्रीतीशी नाममात्रही संबंध नव्हता. त्या ओठांमध्ये

'प्रीतीच्या चुंबनांनी देऊन जी घेतली'

ती शिरशिरी बंदिस्त झालेली नव्हती.

किंबहुना ही चुंबने केवळ पाशवी सुखासाठी कामुक आडदांडपणे व निर्लज्जपणे घेतलेली आहेत; आणि चुंबने देणाऱ्या व्यक्तीलाही कामवासनेने इतके बेभान करून टाकले होते की, त्या चुंबनातील आडदांडपणा तिने आनंदाने सहन केला, एवढेच नव्हे तर त्यांची दाहक झिंग आपल्या ओठांत शोषून घेतली, चोरून घेतली. हेतू हा की, तिच्या खुणांनी त्या लज्जतीच्या अल्पजीवी क्षणांची आठवण ताजी ठेवावी, आगीवर तेल शिंपडत राहावे, आणि कल्पनासृष्टीत ही लंपटता व दुराचार यांचा निखारा धगधगत राहावा. वर उद्धृत केलेल्या शेराच्या आधीच्या व नंतरच्या शेरांसह तो वाचल्यास ही गोष्ट अधिक स्पष्ट होते :

काळ्या ओढण्यांचे पदर काळ्या कपाळांवर
काळा पोषाख काळ्या शरीराला लपवीत आहे
काळ्या ओठांवरील काळ्या चुंबनांच्या खुणा
काळ्या खुशीतील झिंग चोरण्याचा प्रयत्न करीत आहेत
आईच्या काळ्या स्तनात काळे दूध आहे
तिने काळ्या मुलांना कुशीत झोपविले आहे.

पारतंत्र्य व दारिद्र्य यांची रात्र ही पापाचीही अखंड काळोखी रात्र आहे; कारण त्यात लहानाची मोठी होणारी मुलेही मोठेपणी आपल्या आईबापांसारखीच होणार. 'झोपविले आहे' हे एक सामान्य वाक्य आहे; परंतु या ठिकाणी कल्पनेच्या भरारीला त्याचा किती छान उपयोग झाला आहे !

काळोख्या रात्री काळ्या गोष्टी कशा दिसतात, अशीही शंका उपस्थित होऊ शकते. वस्तुस्थिती अशी आहे की, रात्रीचा पसरलेला व भयानक काळोख इतका काही दाट नसतो, की त्यामुळे प्रत्येक वस्तू एकदम दिसेनाशी व्हावी. वस्तूंचे आकार अंधुक

होतील; परंतु ते डोळ्यांना अवश्य दिसतील. सर्वत्र पसरलेला काळोख काळ्या रंगाचा पडदा बनेल व त्यावर काळ्या वस्तू सावल्यांप्रमाणे दिसतील. शिवाय डोळ्यांना हळूहळू काळोखाचा सराव होतो आणि प्रारंभी न दिसणाऱ्या वस्तू दिसू लागतात.

पापाने भरलेल्या या काळोखाचे कारण काय ?
ही रात्र म्हणजे गुलामी मनोवृत्तीचा अंधार आहे
ती प्रकाशापासून तोंड लपवून फिरत आहे .

जोपर्यंत क्रांती होत नाही तोपर्यंत हा अंधार नाहीसा होणार नाही; आणि जोपर्यंत मनोवृत्तीत तेजाचा प्रकाश पडत नाही तोपर्यंत क्रांती होणार नाही. नुसत्या घोषणा केल्याने काहीही होत नसते.

क्रांतीच्या प्रभातीचा तो उजेड कोठे आहे ?
मानवाच्या अंतरात्म्याचा तो सूर्य कोठे आहे ?

पहिले दृश्य म्हणजे पवित्र व निरागस प्रीतीची सोनेरी सरिता आहे. त्यातील काही शेर पाहा :

तू माझ्या नजरेला लाजतेस
फुलाने पहाटवाऱ्याला लाजायचे असते काय ?

इकडे सौंदर्यामध्ये फुलाचा कोमलपणा आणि तिकडे प्रीतीमध्ये पहाटवाऱ्याची प्रसन्नता, मोहकता व आकर्षकता. तरीदेखील सौंदर्य हे लाजाळू व संकोचशील आहे. सौंदर्य व प्रीती यांच्यातील खरा परस्परसंबंध हाच आहे. दुसऱ्या चरणातील शब्द-योजना, आश्चर्योद्‌गार या सर्वांतून पावित्र्य व्यक्त होत आहे. लाजायचे ? आणि पहाटवाऱ्याला, फुलाने ? मरियमच्या मनातील आनंदोर्मी कदाचित पुढील शब्दात व्यक्त होऊ शकतील :

सौंदर्याच्या लाजण्याने फसू नकोस
त्याला नजरेची चांगली ओळख आहे
पवित्र प्रीतीवर त्याचा पूर्ण विश्वास आहे ( '**असर**' )
सूर्यास्ताचे दृश्य पाहा :
दिवस हळूहळू मावळत होता
वातावरणात सोने वितळत होते
क्षितिजावर किरण स्वप्न विणीत होता
क्षितिजावरील लाली आपली ओढणी आवरीत होती

सूर्याचे किरण किंचित अंधुक होत असताना त्याला स्वप्न विणण्याची उपमा देणे आणि सूर्यास्तानंतर क्षितिजावरील लालिमा हळूहळू कमी होत नाहीसा होत असताना त्याला ओढणी गुंडाळून घेण्याची उपमा देणे यातून प्रतिभेची भरारी व सूक्ष्मदृष्टी व्यक्त होते. चित्रकाराचा कुंचलाही या वर्णनाने लाजून जाईल. उर्दू भाषेला अभिमान वाटावा असे हे शब्दचित्र खचितच आहे.

खालील काव्यपंक्तींमध्ये स्त्रीच्या माता बनण्यापूर्वीच्या भाव-भावनांचे निरुपम शब्दचित्र पाहावयास मिळते. तसेच मानसशास्त्रातील एका दिव्य-भव्य समस्येचाही त्यात निर्देश आहे. ती समस्या अशी की, आईचा स्वभाव व तिचे चारित्र्य यांचाच नव्हे तर गर्भवती स्त्रीच्या मनात गरोदरपणी जे विचार व ज्या भावना घोळत असतात त्यांचा परिणाम जन्मास येणाऱ्या मुलावर होण्याची शक्यता असते, त्या गोष्टी त्या मुलातही उतरू शकतात, ही होय.

कुणी तरी माझ्या कुशीत फडफडते आहे
माझ्या श्वासोच्छ्वासात जणू एक हृदय धडधडते आहे
शरीरामध्ये ताऱ्यांची सळसळ आहे
नसानसातून एक मंद गुणगुण ऐकू येत आहे
नजर धुंद होऊ लागली आहे
प्रत्येक गोष्टीवर प्रेम करावेसे वाटू लागले आहे

अशाच मातेच्या मांडीवर खेळून वाढलेला मुलगा नव्या मनूचा शिलेदार होतो
आणखी एक आकर्षक शब्दचित्र पाहा :

वाऱ्याला कस्तुरीचा सुगंध येत आहे
वातावरणाला सोन्याचा मुलामा आहे
क्षितिजाच्या डोंगरांवरून
अरुणिमेचे धबधबे कोसळत आहेत
फांद्यांवरील पक्षी म्हणजे
आकाशगंगेतील पाने-फुले आहेत
पाणी, माती व वारा
यांचे हे जग फारच सुंदर आहे
जर कुठे स्वर्ग असेल तर तो या पृथ्वीवरच आहे.

यातील दुसरा चरण जितका नावीन्यपूर्ण तितकाच रंगदार आहे :

क्षितिजाच्या डोंगरावरून
अरुणिमेचे धबधबे कोसळत आहेत.
जलाशयामध्ये अनेक शक्ती सळसळत आहेत
हजारो तेजोवलये एका ठिणगीत स्मित करीत आहेत

अनादिकाळापासून ती अस्वस्थपणे
कोणाची तरी प्रतीक्षा करीत आहेत
पाणी, माती व वारा
यांचे हे जग फारच सुंदर आहे
जर कुठे स्वर्ग असेल
तर तो या पृथ्वीवरच आहे

पाण्यातून शक्ती ( Hydraulic power ) प्राप्त करण्याची साधने व शक्यता यांचा समावेश पहिल्या चरणात आहे. विद्युत्‌शक्तीचा खजिना किंवा भांडार हे पाणीच आहे. जाफरीसाहेबांच्या काव्यात्म भाषेत, 'हजारो तेजोवलये एका ठिणगीत स्मित करीत आहेत'. लाटांची अस्वस्थता म्हणजे रहस्य जाणणाऱ्या मर्मज्ञाची शिगेला पोचलेली उत्सुकता आहे. ईश्वरी सृष्टीच्या हितासाठी आपला केव्हा उपयोग करून घेतला जातो, याची त्या लाटा उत्सुकतेने वाट पाहात आहेत.

झोपेचे हे शब्दचित्र पाहा :

निद्रा ही एक सुंदरी आहे
तिचे डोळे निळसर तांबूस आहेत
तिचे वक्षःस्थळ घनःश्याम आहे
तिच्या पापण्यांच्या छायेत
स्वप्नाच्या धुंद पडछाया खेळत असतात
ती गरीबांच्या दुःखात सहभागी होते
आणि दुःखी लोकांचे सांत्वन करते
सामाजिक विषमतेचा तिला तिटकारा आहे
ती रात्री येते
साऱ्या जगाला थोपटून निजविते
मुलांसाठी अंगाई गीते गाते
फुलांना कुरवाळते

आणि साऱ्या जगावर जादू भरलेल्या बोटांनी
दवबिंदू शिंपडते
अशा प्रकारे निसर्गाच्या दरबारातील
प्रत्येक गोष्टीला एक नवे जीवन प्रदान करते
एक नवी टवटवी आणते

शब्दांच्या धिम्या लयीतील नादमाधुर्याने निद्रेचे शब्दचित्र साकार बनत आहे आणि डुलकीचा आभास निर्माण होत आहे. काही चरणांची विभागणी कदाचित् यापेक्षा अधिक चांगल्या प्रकारे करता आली असती. परंतु त्या चर्चेत मला शिरावयाचे नाही.

करुणरसाचा एक नमुना :

जीवनाच्या वसंत ऋतूंनो, तुम्हाला शेवटचा रामराम
हे शाश्वत ठिणग्यांनो, तुम्हाला शेवटचा रामराम
आकाशस्थ दृश्यांनो, तुम्हाला शेवटचा रामराम
हे चंद्रा, हे सूर्या, हे ताऱ्यांनो, तुम्हाला शेवटचा रामराम
निळसर डोंगरांनो, तुम्हाला शेवटचा रामराम
हे रुपेरी झऱ्यांनो, तुम्हाला शेवटचा रामराम
गुणगुणणाऱ्या वाऱ्यांनो, तुम्हाला शेवटचा रामराम
हे हसऱ्या वातावरणांनो, तुम्हाला शेवटचा रामराम
हे उषे, हे संध्ये, तुम्हाला शेवटचा रामराम
प्रियतमेच्या सौंदर्या, तुला शेवटचा रामराम
क्रांतिकारक तरुणांनो, तुम्हाला शेवटचा रामराम
हिंदरूपी बागेच्या माळ्यांनो, तुम्हाला शेवटचा रामराम
जेव्हा तुम्ही नव्या आराखड्यात रंग भराल
तेव्हा आम्हा हुतात्म्यांचीही आठवण ठेवा

पण मी अशी उदाहरणे देत बसलो तर सारे पुस्तकच उद्धृत करावे लागेल ! काव्य म्हणजे साकार सौंदर्यच आहे ! माझा हा शेर त्याला पूर्णपणे लागू पडतो :

सारे हावभाव वेगवेगळे आहेत
पण त्यातील प्रमाणबद्धतेचे काय वर्णन करावे ?

जणू एकाच गाण्यातील ते परस्परसंबद्ध सूर आहेत. म्हणून " आता वाणीपेक्षा मौनच श्रेयस्कर होय ". या शेराचा पहिला चरण असा आहे :

आपल्या लज्जतीत गीते स्वत:ला हरवून बसली

एकूण विचार करता हे दीर्घकाव्य अत्यंत प्रशंसनीय व उर्दू साहित्यात मोलाची भर घालणारे आहे. जाफरीसाहेबांनी काव्याच्या या ज्या नवीन वाटा शोधून काढल्या आहेत, किंबहुना त्यांची साफसफाई करून त्या पुढे ठेवल्या आहेत त्यासारख्या वाटांनी इतर पुरोगामी साहित्यिक व कवी मार्गक्रमण करतील तर किती बरे होईल ! ते तसे करतील तर त्यांची स्तुती करण्यात मी मुळीच कृपणता दाखविणार नाही; उलट मी त्यांचे गुणगान करीन, त्यांच्या यशाचे पोवाडे गाईन. मी काहीसे असे उद्‌गार काढीन

वसंत ऋतू तुझ्या गालाचे ध्यान करीत आहे
लाल फुलांचे दिवे लुकलुकत आहेत

सध्या तरी या सन्मानाचे खरे मानकरी सरदार जाफरीसाहेब आहेत. त्यांच्या काव्याचे वाचन करीत असता या काव्यपंक्ती बरोबर लागू पडल्या.

ज्याला बंडखोरपणा आवडत नाही तो आमच्यापासून दूर पळून जातो जो बंड करून हुतात्मा होत नाही तो आमच्या टोळीतील नव्हे.

— 'नजीरी'

## पात्रे

जावेद

फिरंगी

मरियम

जासूद

जीवन

इतिहास

काळ

मृत्यु

# उपोद्घात

काळ्या रंगाचे झेंडे वाऱ्यावर फडफडत आहेत
काळोखी रात्र डोके वर काढून उभी आहे
काळ्या बटांशी काळे साप बिलगलेले आहेत
त्यांच्या काळ्या फणा म्हणजे हसरी काळी फुले आहेत
काळ्या घोड्यांच्या टापांनी जमीन हादरत आहे
काळ्या गिधाडांनी काळे आकाश व्यापिले आहे
काळ्या छात्या पुढे काढून काळ्या डोंगरांनी
काळ्या लोखंडाची भिंतच जणू बनविली आहे
काळे खोरे, काळे मैदान, काळी नदी
काळे अरण्य, काळी शेते बहरली आहेत
काळ्या कारखान्याच्या काळ्या धुराड्यावर
काळ्या धुराचे काळे ढग थरथरत आहेत
काळा दिवा, काळा प्रकाश, काळ्या ज्योती
काळ्या घरात जणू काळे जाळे पसरले आहे
काळ्या किड्यांप्रमाणे वळवणारी माणसे
काळ्या भुतांप्रमाणे अंधारात सरपटत आहेत
काळ्या ओढण्यांचे पदर काळ्या कपाळांवर
काळा पोषाख काळ्या शरीराला लपवीत आहे
काळ्या ओठांवरील काळ्या चुंबनांच्या खुणा
काळ्या खुशीतील झिंग चोरण्याचा प्रयत्न करीत आहेत
आईच्या काळ्या स्तनात काळे दूध आहे

तिने काळ्या मुलांना कुशीत झोपविले आहे
काळ्या वातावरणात काळे तीर सूं सूं करीत आहेत
काळे बाण काळ्या विषात बुडविलेले आहेत
काळे सूळ, काळी फाशी, काळे फास
काळ्या हातांनी काळ्या माना दाबल्या आहेत
शरीरावर काळे वळ काळ्या चाबकांचे
काळ्या जखमांमुळे काळा ठणका लागला आहे
काळा जुलूम, शील काळे, काळे आक्रोश
काळा न्याय काळे तुरे खोवून बसला आहे
काळ्या रंगाचे जादूगार काळे डगले चढवून उभे आहेत
काळे तट कपाळाला काळ्या आठ्या घालून उभे आहेत
ही रात्र म्हणजे गुलाबी मनोवृत्तीचा अंधार आहे
ती प्रकाशापासून तोंड लपवून फिरत आहे

क्रांतीच्या प्रभातीचा तो उजेड कोठे आहे ?
मानवाच्या अंतरात्म्याचा तो सूर्य कोठे आहे ?

# पहिले दृश्य

प्रीतीने अंधारातून प्रकाश बाहेर काढला आहे
प्रीती नसती तर अभिव्यक्तीही शक्य झाली नसती
— **मीर**

## पहिले दृश्य

( अंधारातून दोन आकृत्या दिसू लागतात. त्यांपैकी जावेद हा वराच्या पोशाखात असून मरियम वधूच्या पोशाखात आहे. )

ढगामध्ये चंद्र कुठवर लपून राहाणार ?
प्रीतीपासून सौंदर्य कुठवर लपून राहाणार ?
तू माझ्या नजरेला लाजतेस
फुलाने पहाटवाऱ्याला लाजायचे असते काय ?
माझ्या स्वभावाचे रहस्य तुला माहीत नाही काय ?
तू माझी बाळपणीची मरियम नाहीस काय ?
तुझ्या अभिलाषेत घालविलेल्या रात्री
कस्तुरीचा सुगंध असलेल्या केसांच्या बटांत
गोळा झाल्या आहेत
तुझ्या ज्या पापण्या लज्जेने अवनत होत आहेत
त्या माझ्या हृदयात खुपसल्या जात आहेत
तुझ्या चेहऱ्यावरील सौंदर्याचे व प्रीतीचे वलय
हाच माझ्या जीवनाचा प्रकाश आहे
हे निर्मळ डोळे, डोळ्यांतील लालिमा
जणू गुलाबी पेले ओसंडत आहेत
हातांना मेंदी लावली आहे
जणू तळहातावर कमळे उमलली आहेत
प्रीतीच्या रात्रींची तू पणती आहेस

तारुण्याच्या स्वप्नांची तू परिपूर्ती आहेस
तुझ्या खाली वळलेल्या नजरेत एक ऊब आहे
तुझ्या सौंदर्याचा प्रकाश माझ्या घरात पडला आहे
तू आपल्या संभाषणाने संगीत निर्माण कर
आपल्या स्मिताने फुलांना हसायला शिकव
तुझ्या स्मितात हे केवढे आकर्षण आहे !
जणू फुलांवर झोपलेले ते चांदणेच आहे
परंतु आत्म्याची तहान कशी भागणार ?
समुद्राकडून काय नुसते दवबिंदूच मिळणार ?
तू प्रीती आहेस, गीत आहेस, मदिरा आहेस, सुरई आहेस
तूच माझे सारसर्वस्व आहेस
तुझे मौन केवढे बोलके आहे !
तुझी उपेक्षावृत्ती अगदी ऋषितुल्य आहे
आपल्या हृदयातील अभिलाषा जुनी आहे
आपली प्रीतिमदिरा जुनी आहे
ती जुनी संध्याकाळ मला अजून आठवते
माझ्या अंतःकरणात ती अजून सुरक्षित आहे
दिवस हळूहळू मावळत होता
वातावरणात सोने वितळत होते
धूसरतेच्या सावल्या नाचत होत्या
दाही दिशा आळोखेपिळोखे देत होत्या
क्षितिजावर किरण स्वप्न विणीत होता
क्षितिजावरील लाली आपली ओढणी आवरीत होती
तुझ्या आत्म्यावर व मनावर ढग पसरले होते
तू माझ्याजवळ मान खाली घालून उभी होतीस
पण आपला सुवास उधळत होतीस
तुझ्या कपड्यांतून सुगंध दरवळत होता
तुझ्या डोकीवरील पदर सरकला होता
माझ्या नसानसांत एक वाद्य झंकारत होते
आजच्या रात्रीप्रमाणेच पापण्या लवल्या होत्या

हृदय धडधडत होते, नाडीचे ठोके बंद पडले होते
सूर्याने खाली वाकून भूमीला आलिंगन दिले
रात्रीने आपले भाल ताऱ्यांनी सजविले
काळी बट घसरून खांद्यावर आली
तुझ्या चेहऱ्यावर जणू एक ज्योत लुकलुकली
तू डोळे वर करून माझ्याकडे पाहिलेस
आणि स्मित करून खुणेनेच काही तरी म्हटलेस
परस्परांच्या नजरांचा संदेश आपण ओळखला
आणि प्रीतीचा पहिला प्याला ओठांना लावला
त्याच प्याल्याने आपल्याला धुंद बनविले
आपल्या आकांक्षेला जागृत ठेवले
वियोगातही धीर धरण्यास शिकविले
आगीवरून चालण्यास आपल्याला शिकविले
अभिलापांनी मागितलेली ही राव आहे
विरही जीवांची ही भेट आहे

( मरियम जावेदकडे प्रेमपूर्ण नजरेने पाहाते आणि लगेच मान खाली घालते. तिच्या डोळ्यांतून दोन पाणीदार अश्रू ओघळतात आणि गौर गालांवर चांदीच्या दोन रेषा उमटतात. )

**मरियम** :

माझे सारे वैभव म्हणजे प्रीतीचे अश्रू

**जावेद** :

प्रीतीचे अश्रू, आनंदाचे अश्रू
हे अश्रू आहेत भग्न हृदयांचे आधार
मानवाच्या भाग्याचे ते तेजस्वी तारे आहेत
तुझे सारे अस्तित्व तुझ्या पाणावलेल्या डोळ्यांत सामावले आहे
तुझ्या पायगुणाने माझे घर वैभवाला चढेल
प्रत्येक सुखदु:खातील सहभागीण पत्नी असते
ती नरकाचा स्वर्ग बनविते
ललाटावर आत्मतेजाचे तारे चमकत असतात

नजरेत जुलेखाचे* हसरे यौवन असते
ती अभीष्टही असते आणि अभिलाषिणीही
ती सहनशीलही असते आणि सांत्वन करणारीही
ती वाद्य आहे, गीत आहे, गीतकारही आहे
उपवन आहे, फूल आहे, पहाटवाराही आहे

**मरियम** :

मला ती रात्र अजून आठवते आहे
ते क्षण अजून माझ्या मुठीत बंद आहेत
ते कळीप्रमाणे उमलत होते
आणि विरघळून रक्तात एकजीव होत होते
अभिलाषा स्वप्न बनून फडकत होत्या
अंधारात काजव्यांचा वर्षाव होत होता
लज्जा व संकोच स्थलकालातीत झाले होते
शाश्वत सुखाचे झरोके उघडले होते
माझ्या नसानसांतून ठिणग्या सळसळत होत्या
चंद्र-तारे माझ्याभोवती नृत्य करीत होते
एक वादळ बनून ती रात्र आली होती
समुद्राच्या हृदयातील तुफानी अस्वस्थता तिच्यात होती
प्रीतीच्या धुंदीने भरलेली ती रात्र होती
तारुण्यातील सर्वात सुंदर अशी ती रात्र होती

**जावेद** :

ती रात्र आजपर्यंत सौंदर्याचा वर्षाव करीत आहे
ती रात्र आजच्या रात्रीबरोबर फडफडत आहे

* यूसुफ व जुलेखा या प्रणयी युगुलातील प्रणयिनी – अनुवादक

# दुसरे दृश्य

बागेच्या मांडीवर फूल हवे
जीवनाला सातत्य हवे

— — जाफरी

# दुसरे दृश्य

**जावेदचे गीत** :

जमिनीवर रात्रीच्या पापण्यांची सावली पडते
काळोख कठोर स्तब्धतेचा भार सहन करतो
हवेत काजव्यांप्रमाणे क्षण उडत असतात
वातावरणाच्या अंतःकरणात ते जणू आग भडकवितात
अंधाराचे मखमली पडदे सरकत आहेत
जणू कोणी अंग चोरून चालले आहे
काळाच्या लाटेवर आरूढ होऊन कोणी वर येत आहे
त्याने आपल्या ललाटावर इंद्रधनुष्य धारण केले आहे
मध्यरात्रीची नशा डोळ्यांतील काजळ बनली आहे
तिने तळहातावर मेंदीची रसरशीत कमळे फुलविली आहेत
माझ्या जवान अभिलाषेच्या नखरेल फुलांनी
एका माणसाने आपला काळाभोर केशकलाप सजविला आहे
अंधुक ताऱ्यांच्या नऊ झुडुपात
तिच्या लाल ओढणीचे काठ चमचमत आहेत
धडधडणाऱ्या छातीवर पदराच्या रेशमी सुरकुत्यांनी
गतरात्रीचे सुंदर चांदणे लपविले आहे
बांधेसूद व नाजुक बाहूंच्या कंपनात
तारुण्य व काव्य यांचा मदालस भरलेला आहे
स्वप्न व सत्य यांच्या सीमेवर ती उभी आहे
तिने काळोख्या रात्रीच्या हृदयात बाग फुलविली आहे

निष्ठेच्या आवेशामुळे चेहऱ्यावर हृदयाचा प्रकाश पसरला आहे
लज्जेच्या रंगाने गाल लाल झाले आहेत
कपाळावर नकाराच्या जितक्या सुंदर आठ्या आहेत
तितकेच होकार ओठांवर स्मित करीत आहेत

**मरियम** :

स्त्री हे प्रीतीचे उद्दिष्ट आहे
स्त्री हे तळमळणारे, हट्ट करणारे अंतःकरण आहे
हे मी मान्य करते
तरी पण तिचे स्थळकाळ आणखीही आहेत
" ताऱ्यांच्या पलीकडे आणखीही जगे आहेत " *
काळाच्या किनाऱ्यांपासून ती निघते
आणि अनेक मुक्काम पार करून पुढे जाते
स्त्री ही कधी मद्यचषक बनून ओसंडू लागते
तर कधी अश्रू बनून चमकत राहाते
ती काही केवळ चार क्षणांची सोबतीण नव्हे
स्त्री ही काही नुसती मध व दवबिंदू नव्हे
ती केवळ स्मित नाही, तलवारही आहे
ती केवळ गीत नाही, झंकारही आहे
प्रीतीच्या गादीवर ती तारुण्य व सौंदर्य असते
तर रणांगणावर ती झांशीची राणी असते
ती शयनागारातील दीपक व पहाटेचा प्रकाश आहे
ती प्रत्येक पावलावर पुरुषाची सहप्रवासिनी आहे
पण या सर्वांपेक्षा महत्त्वाची गोष्ट म्हणजे ती आई आहे
ती सृष्टीच्या हृदयातील अव्यक्त व्यथा आहे
शिंपल्याच्या चमकदारपणात ती मोत्याची तल्लीनता आहे
कळीत असलेले सुप्तावस्थेतील फूल व फळही ती आहे
नजरेत आहे प्रेयसीचा नखरा
पण भाळी आहे मातृत्वाची महत्ता

* महाकवी इकबाल यांची प्रख्यात काव्यपंक्ती – अनुवादक

ती स्त्रीच्या शारीरिकतेची चमक आहे
तर ही स्त्रीच्या आत्मिकतेची झलक आहे
यौवनाला स्त्री प्रफुल्लित बनविते
आणि प्रीतीला ती टवटवीत बनविते
तिच्यामुळेच मानवजात टिकून आहे
जीवन-दीपक तिच्यामुळेच तेवत आहे
मुलाला ज्या पदराखाली ती झाकून घेते
ज्या मांडीवर ती मुलाला वाढविते
त्या पदरामध्ये जीवनाचा निखारा आहे
ती मांडी संस्कृतीचा पाळणा आहे
प्रीतीच्या रात्रींच्या माधुर्याला
यौवनाच्या धुंद रंगेलपणाला
दृष्टीतील रसाला, ओठांतील शर्करेला
मुवासिक, टवटवीत स्मित-पुष्पांना
स्त्री नवा रंग, नवे रूप देते
त्यांना ती नवा आकार प्रदान करते

**जावेद** :

काल जी पालवी होती ती आता फुलांची फांदी बनली आहे
तू माझ्या मुलाची आई बनणार आहेस

**मरियम** :

कुणी तरी माझ्या कुशीत जणू फडफडत आहे
माझ्या श्वासोच्छ्वासात जणू एक हृदय धडधडत आहे
नमानसांत कुणी तरी भरून राहिला आहे
माझ्या आत्म्यावर एक रंग चढला आहे
कोणी तरी हृदयात आळोखेपिळोखे देत आहे
माझ्या रक्तात कोणी तरी होड्या वल्हवीत आहे
शरीरामध्ये ताऱ्यांची मळमळ आहे
नमानसांतून एक मंद गुणगुण ऐकू येत आहे
माझ्या मेंदूत वारे भिरभिरत आहे

जणू सोनेरी ढग भरून आले आहेत
वातावरणात नाना आकृत्या तयार होतात व विरून जातात
लक्षावधी कळ्यांचा सुगंध हवेत दरवळतो आहे
एक भरतीची लाट पुढे पुढे सरकते आहे
नदीचे पाणी हळूहळू वाढत आहे
नजर धुंद होऊ लागली आहे
प्रत्येक गोष्टीवर प्रेम करावेसे वाटू लागले आहे
जमीन, आकाश, चंद्र, सूर्य, तारे
मला दुरून खुणावत आहेत
वसंत ऋतूशी माझी मैत्री जडली आहे
वारे माझी भाषा बोलू लागले आहेत
पहाटवारा मला गुदगुल्या करतो आहे
मला पाहून कळी स्मित करते आहे
एक अभिलाषा माझ्या कुशीत वाढते आहे
माझी कल्पना लडिवाळपणे रांगू लागली आहे
रक्त नाचते आहे, शिरा धडधडत आहेत
माझ्या शरीराला पालवी फुटत आहे

**जावेद :**

मानवाचे जीवन मोठे काव्यमय आहे
ते चिरंतन राहावे यासाठी प्रीती ही एक सबब आहे
कानगोष्टीतून निर्माण होणारे ते गीत आहे
परस्पर आलिंगनातून त्याचा जन्म होत असतो
पापण्या थरथरतात, भुवया संकोचतात
कूस फडफडते, बाहू फुरफुरतात
मने तळमळतात, ऊर धडधडतात
नौका घेऊन यौवन प्रवासाला निघते
ललाट तेजाने तळपते, चेहरे चमकदार बनतात
फुलांचे हिरवेगार ताटवे सुगंधाने दरवळतात
कपाळावरील चंदन उठून दिसते

आणि कलाबतूचे चूर्ण* झळाळू लागते
फांद्या लवतात, कळ्या उमलतात
तेजोवलये निर्माण होतात व विरून जातात
तेजोवलये विरून जातात नि पुन्हा तयार होतात
केसांच्या बटा ओघळतात, पदर खाली ढळतात
ढग भरून येतात, ढग वर्षाव करतात
जीवनाचा ध्वज असाच फडफडतो
जीवनरूपी काफिला मुळीच थांबत नाही
सातत्य हेच सत्य, सातत्य हेच कल्पित
सातत्य हेच जीवनाचे गीत आहे
फुलबाजीप्रमाणे एका किरणातून
दुसरा किरण बाहेर पडत असतो

* अफशाँ : कलाबतूचे बारीक चूर्ण. स्त्रिया आपल्या केसावर व गालावर हे चूर्ण शोभेसाठी वापरतात — अनुवादक

## तिसरे दृश्य

पारतंत्र्यात जीवन कमी पाण्याच्या नदीप्रमाणे आटून जाते
आणि स्वातंत्र्यात जीवन उसळता सागर बनते

'इकबाल'

# तिसरे दृश्य

( मरियम फाटक्या कापडाच्या तुकड्यांचे आपल्या भावी मुलासाठी एक आंगडे शिवीत आहे . हे तुकडे वेगवेगळ्या रंगांचे आहेत. )

पार्श्वभूमीवरून समूहगान ऐकू येते.

**जीवनाचे गीत** :

पाणी, माती व वारा यांचे हे जग फारच सुंदर आहे
जर कुठे स्वर्ग असेल तर तो पृथ्वीवरच आहे

वाऱ्याला कस्तुरीचा सुगंध येत आहे
वातावरणाला सोन्याचा मुलामा आहे
क्षितिजाच्या डोंगरांवरून
अरुणिमेचे धबधबे कोसळत आहेत
फांद्यावरील पक्षी म्हणजे
आकाशगंगेतील पाने-फुले आहेत
पाणी, माती व वारा यांचे हे जग फारच सुंदर आहे
जर कुठे स्वर्ग असेल तर तो या पृथ्वीवरच आहे

गंगेच्या लहरींतून सारंगीचे सूर ऐकू येतात
दगडाधोंड्यांतून कलापूर्ण मूर्ती साकार बनतात
सूर्याचा रथ रंगीबेरंगी तेजातून धावत असतो
पाणी, माती व वारा यांचे हे जग फारच सुंदर आहे
जर कुठे स्वर्ग असेल तर तो या पृथ्वीवरच आहे

हिमालयाची शिखरे गगनाला भिडली आहेत
त्यांच्यासमोर जगातील सम्राट अगदी तुच्छ आहेत
हिमालय हा आशियाचा लौकिक व भारताचा गौरव आहे
पाणी, माती व वारा यांचे हे जग फारच सुंदर आहे
जर कुठे स्वर्ग असेल तर तो या पृथ्वीवरच आहे

प्रणयसागराची लाट चंद्रामध्ये सळसळत आहे
तिची सारखी चलबिचल, तळमळ चालू असते
ती व्यथेने तडफडत असते, रागाने फणफणत असते
पाणी, माती व वारा यांचे हे जग फारच सुंदर आहे
जर कुठे स्वर्ग असेल तर तो या पृथ्वीवरच आहे

पहाटवारा सुगंधाचे तांडे बरोबर आणतो
फुलांच्या सुवासाने मनाला प्रसन्नता लाभते, धुंदी चढते
प्रसन्नता व धुंदी यांच्यांत मदिरालयातील नशा असते
पाणी, माती व वारा यांचे हे जग फारच सुंदर आहे
जर कुठे स्वर्ग असेल तर तो या पृथ्वीवरच आहे

केसांच्या बटांच्या सावलीत रसरशीत गालांचा रंग
रेशमी वाऱ्यांवर सुगंधित पदरांचे नृत्य
वातावरणात लचकदार तनूंचे कंपन
पाणी, माती व वारा यांचे हे जग फारच सुंदर आहे
जर कुठे स्वर्ग असेल तर तो या पृथ्वीवरच आहे

ओठांत मध, डोळ्यांत निर्भेळ मदिरेचा रस
जीवनसारंगीवर पहिले गीत यौवनाचे
हृदयांच्या शाळेत प्रीतीच्या पुस्तकातील धडा
पाणी, माती व वारा यांचे हे जग फारच सुंदर आहे
जर कुठे स्वर्ग असेल तर तो या पृथ्वीवरच आहे

तरुण ओठांवरील स्मितात पुष्पवृष्टी
घामाने थबथबलेल्या कपाळांच्या उष्णतेत आकाशगंगा

सौंदर्याच्या पराजयातही सौंदर्याच्या विजयाच्या कथा
पाणी, माती व वारा यांचे हे जग फारच सुंदर आहे
जर कुठे स्वर्ग असेल तर तो या पृथ्वीवरच आहे

उपवनात जीवनरूपी बुलबुलाचे गाणे घुमते
जीवनरूपी फुलाचा रंग अधिकाधिक खुलतो
बालपण हा जीवनसातत्याचा दैवी चमत्कार आहे
पाणी, माती व वारा यांचे हे जग फारच सुंदर आहे
जर कुठे स्वर्ग असेल तर तो या पृथ्वीवरच आहे

जलाशयांमध्ये अनेक शक्ती सळसळत आहेत
हजारो तेजोवलये एका ठिणगीत स्मित करीत आहेत
अनादिकाळापासून ती अस्वस्थपणे कोणाची तरी प्रतीक्षा करीत आहेत
पाणी, माती व वारा यांचे हे जग फारच सुंदर आहे
जर कुठे स्वर्ग असेल तर तो या पृथ्वीवरच आहे

विश्वाच्या गुणधर्मात आगीच्या ठिणग्या आहेत
त्यांचेच गरम रक्त जीवनाच्या नसानसांतून वाहाते
पण त्या शक्ती आज माणसाच्या हातात आहेत
पाणी, माती व वारा यांचे हे जग फारच सुंदर आहे
जर कुठे स्वर्ग असेल तर तो या पृथ्वीवरच आहे

नशिबाचे जाळे फाटून तुटून गेले आहे
निळसर वातावरणावर माणसाच्या नावाचा शिक्का आहे
हे सूर्य, चंद्र व गुरू ? तो तर एका पावलाचा प्रवास आहे
पाणी, माती व वारा यांचे हे जग फारच सुंदर आहे
जर कुठे स्वर्ग असेल तर तो या पृथ्वीवरच आहे

हा वारा, वीज , तिचा गडगडाट सारे कैदी आहेत , गुलाम आहेत
कृतिशीलतेच्या मदिरालयात यशाचे मद्यचषक आहेत
आतापर्यंत कच्चे असलेले सूर पक्के होत आहेत

पाणी, माती व वारा यांचे हे जग फारच सुंदर आहे
जर कुठे स्वर्ग असेल तर तो या पृथ्वीवरच आहे

आकाशगंगेच्या अंगाखांद्यांवर माणूस चढू लागला आहे
शंकाकुशंकांचे काळे डाग माणूस धुऊन टाकीत आहे
आनंदाच्या मद्यात आपली दुःखे माणूस बुडवून टाकीत आहे
पाणी, माती व वारा यांचे हे जग फारच सुंदर आहे
जर कुठे स्वर्ग असेल तर तो या पृथ्वीवरच आहे

पण गुलाम देशांचे जीवन घुसमटलेले आहे
गरिबांच्या पणतीप्रमाणे त्यांचे जीवन मालवले आहे
चोहोबाजूंनी त्या जीवनाला अंधाराने वेढले आहे

पाणी व माती यांचे हे जग खूपच सुंदर असले
तरी या भूमिरूपी आरशाचे दुःखाने तुकडेतुकडे झाले आहेत

( आरडाओरडा, घोषणा, बंदुकी डागल्याचे आवाज )

**मरियम** :

( प्रवेश करीत )

सगळीकडे कोलाहल माजला आहे
शहरात कोण जाणे काय चालले आहे

**जावेद** :

तू मोहक स्वप्नांमध्ये स्वतःला हरवून बसली आहेस
तू इतकी बेसावध आहेस की जणू झोपेतच आहेस
पाहा त्या इवल्याशा जीवाकडे
जो तुझ्या हृदयाखाली तुझ्या मऊ व उबदार
कुशीच्या पाळण्यात शांतपणे झोपला आहे
त्याच्या शरीराचे व प्राणांचे पालनपोषण
तुझ्या रक्तातून होत आहे
जेव्हा तो या जगात येईल

तेव्हा मातेचे वात्सल्य
तुझ्या निर्मळ वक्षांतून दुधाची धार बनून वाहू लागेल
तुझ्या निर्मळ वक्षस्थळावरील नुकत्याच उमलू लागलेल्य कळया
प्रणयाच्या रात्री उमलून फुले बनत
तेजाने त्यांची दारे, खिडक्या झळाळून उठत
आणि मग चंद्र लाजून ढगात तोंड लपवी
आता त्याच तुझ्या उरात तुझे मातृत्व चुळबुळू लागेल
आणि ते मुलाला छातीशी कवटाळून घेईल
मग ते बालक आनंदातिशयाने
आपले चिमुकले बाहू वर करून
तुझ्या चंद्रासारख्या या गळयाला मिठी मारील
होय, त्या गळयाभोवती माझी उष्ण चुंबने
गळसरीप्रमाणे लपेटलेली आहेत
आणि जेव्हा आपल्या ओठांनी ते
मिटक्या मारीत तुझे दूध पिऊ लागेल
तेव्हा नऊ महिन्यांच्या खडतर श्रमांचा
सारा थकवा तुझ्या नसानसांतून बाहेर येईल
आणि तुला
आपल्या मुसमुसत्या तारुण्याची जाणीव होईल
जेव्हा त्याला झोपेत पऱ्यांची स्वप्ने पडतील
आणि तो बाळ ओठांतल्या ओठांत हळूच हसेल
तेव्हा तुला समजेल की या इवल्याशा निरागस
ओठांमध्ये जगातील सारी संपत्ती गोळा झाली आहे
आणि मग जेव्हा तो रांगू लागेल
बोबडे बोलू लागेल तेव्हा संस्कृतीचे नृत्य व गीत
आपल्या कुशीत अवतरले आहे असे तुला प्रतीत होईल
हा असा आनंद आहे की ज्याच्यासमोर
जगातील सारे आनंद तुच्छ आहेत
पण हिंदुस्थान नावाच्या या देशात
हा आनंदही आपल्या नशिबी नाही

चोहोंकडे दुष्काळाची वावटळ उठली आहे
धुळीतून साथीच्या रोगांची काळी चक्रीवादळे
उठून घोंघावत आहेत
मृत्यूच्या हडळी रडत ओरडत फिरत आहेत
आया आपल्या मुलांना पदराखाली झाकून
भीतीने थरथर कापत आहेत
त्यांच्या कानांवर दाही दिशातून
या भयंकर किंकाळ्या येऊन आदळत आहेत :–
" मातांचे दुधाने भरलेले स्तन सुकून जातील
आणि मुलांच्या ओठांवरील स्मित उडून जाईल
या बागेचे वाळवंट होईल–
जेथे आज दुधाच्या नद्या वाहात आहेत. "
आणि मग तूही, मरियम
माझी मरियम
माझ्या मुलाची आई
तूही बंगालच्या शेकडो स्त्रियांप्रमाणे
आपल्या रडणाऱ्या मुलाला, जिवाच्या काळजाला
निर्मनुष्य रस्त्यावरील रणरणत्या धुळीत
टाकून पळून जाशील – कोठे ?
ज्या ठिकाणी भाकरीच्या वाळलेल्या एका तुकड्यासाठी तरुण स्त्रियांचे शील
मांसाच्या तुकड्यांप्रमाणे विकले जात आहे
अशा कुंटणखान्यात !
तुझ्या अत्याचारपीडित मुलाच्या किंकाळ्या
दूरपर्यंत तुझ्या सावलीचा पाठलाग करतील
स्वप्नात येऊन तुझ्या आत्म्याला गदगदा हलवितील
परंतु तू एखाद्या कुंटणखान्यात
भाकरीच्या वाळलेल्या तुकड्यासाठी
आपले मन, शरीर व आत्मा विकून टाकशील
खुद्द आपल्या हातांनी आपल्या वात्सल्याचा गळा
दाबून टाकशील

**मरियम** :

हाय ! जालीम सरकार

**जावेद** :

भाकरी झाडाला लागत नाहीत
भाकरी आभाळातून पडत नाहीत
आकाशवाणी व ईश्वरी संदेश बनून त्या येत नाहीत
भाकरी, गव्हाच्या चपात्या
लाल सोन्याचे गोल कापलेले तुकडे
चंद्रासारखे गोल व सूर्यासारखे गरम
अरेरे ! या भाकरी आभाळात भाजल्या जात नाहीत
ती आहे माणसाच्या हातांची निर्मिती
त्याच्या शतकानुशतकांच्या श्रमाचे फळ
रणरणत्या उन्हात एक शेतकरी
आपल्या लाकडी नांगराने व लोखंडी फाळाने
शेत नांगरतो
आपल्या नेत्रात शतकांची असहाय्यता
दारिद्र्य व थकवा घेऊन तो येतो
आणि मातीतून उगवणाऱ्या कोंबांकडे
मोठ्या प्रेमळ नजरेने तो पाहातो
आपल्या रडणाऱ्या, तळमळणाऱ्या मुलांचे दु:ख विसरून
आपल्या हातांनी, वाढणाऱ्या रोपांना
तो मोठ्या प्रेमाने पाणी देतो
जणू ती त्याच्या मांडीवर वाढणारी त्याची मुलेच असतात
आणि मग नाजूक रोपावर
गव्हाच्या लोंब्या मोत्यांसारख्या लोंबू लागतात
अशा वेळी शेतकऱ्याचा आत्मा
अधीरपणाने त्यांना कुरवाळतो
आकाश नाचते, जमीन गिरक्या घेते
पिकाची कापणी होते, खळी पडतात
जाती गणगुणतात, मनी गातात

असंख्य हातांतील लाखेच्या व काचेच्या बांगड्या किणकिणतात
आणि चुलीच्या धगीने गाल लाल होतात
अशा प्रकारे गव्हाचे चंद्र-सूर्य
खेड्यांत, शहरांत, प्रत्येक ठिकाणी तळपत
चुलींवर नृत्य करतात
भाकरी, गव्हाच्या चपात्या , लाल सोन्याचे गोल कापलेले तुकडे
चंद्रासारखे गोल व सूर्यासारखे गरम
भाकरी झाडाला लागत नाहीत
भाकरी आकाशातून पडत नाहीत
आकाशवाणी, ईश्वरी संदेश बनून अवतरत नाहीत
माणसाच्या हातांनी त्यांची निर्मिती होते
परंतु आज माणसांच्या हातांनी तयार झालेल्या भाकरींसाठी
स्त्रियांचे शील विकले जात आहे
त्यांची अब्रू विकली जात आहे
गोळीबार केला जात आहे
रक्ताचे पाट वाहात आहेत
जाती स्तब्ध आहेत,. गावातील तरुणी गप्प आहेत
बांगड्या किणकिणत नाहीत
आजही शेतांची कापणी होते
आजही खळी घातली जातात
पण आता गावे ओसाड पडली आहेत
काळ्या बाजाराचा झगझगाट वाढत आहे
मुली जाती सोडून दारोदार वणवण फिरत आहेत
शेतकन्यांचे डोळे निष्प्राण बनले आहेत
त्यांत शतकानुशतकांची असहाय्यता
गरिबी व थकवा भरलेला आहे
उपासमारीने आपली मुले मरत असल्याचे ते पाहात आहेत
पाहा तर खरी, या जुलमी इंग्रजी राज्यात
भूक आणि मृत्यू यांच्या सावलीत
किती स्वतंत्र आहोत आपण !

**मरियम :**

हाय ! जालीम सरकार

**जावेद :**

आपल्या विवस्त्र शरीराकडे पाहा
यौवनाचे मनोहर उपवन असलेल्या त्या शरीरावर
पानगळ ऋतूच्या रंगासारखे दारिद्र्य पसरले आहे
चिंध्या आणि ठिगळे यांनी भरलेले तुझे हे कपडे
वाळलेल्या पाचोळ्यासारखे हसत आहेत
आणि तू मला अशी दिसते आहेस
जणू पानगळ ऋतूतील फुलांच्या रडणाऱ्या फांद्याच
आपण आहोत त्या देशाचे रहिवासी –
ज्याची ढाक्याची मलमल पाहून
वाहत्या पाण्याचा भास होत असे*
आम्ही तंजेब§ मलमल विणतो
ढगातून झिरपणाऱ्या चांदण्याप्रमाणे
तिच्या यौवनयुक्त शरीराची शोभा बाहेर पसरते
'जामदानी' नावाच्या बुट्टीदार मलमलीच्या
चोळ्या आम्ही शिवतो
तिच्या प्रत्येक धाग्यातून मोगरीच्या कळ्या स्मित करतात
आणि त्याहून सुंदर कशिदा काढलेले पदर–
ज्यांच्या सावलीत तारे विसावतात
आणि ते काश्मीरचे रेशमी कपडे–
ज्यांवरून वारून टाकावेत सॅटिन, मखमल व फरचे कपडे
हे सारे आहेत हिंदुस्थानचेच
पण आम्हा गुलामांना ते वापरण्याचा अधिकार नाही

* 'आबेरवाँ' (वाहते पाणी) या नावाची उत्कृष्ट मलमल भारतात तयार होत असे. तिच्याकडे पाहिल्यानंतर वाहत्या पाण्याचा भास होई. त्यावरून त्या कापडाला हे नाव देण्यात आले होते – अनुवादक

§ तन (शरीर) + जेब (शोभा) = शरीराची शोभा, उत्कृष्ट मलमल –अनुवादक

आता त्यांचे वर्णन करणे निरर्थक आहे
कारागिरांचे जखमी अंगठे *
दीडशे वर्षांपासून जुलुमाची कथा सांगत आहेत
आमच्या नशिबी कारखान्यातील मांजरपाट
चिटाचे एक फडके
जाड्याभरड्या खादीचा अंगरखा
आणि खरखरीत, भिकारडे कफन ( प्रेतवस्त्र )
एवढेही नाही
स्त्रियांचे शील पदराशिवाय भटकते आहे
कफनाअभावी प्रेते सडत आहेत
मात्र काळ्या बाजारात
'देशभक्ती'च्या गोणपाटात गुंडाळलेली
ठाणेच्या ठाणे ठेवलेली आहेत
पाहा तर खरी, जुलुमी इंग्रजी राज्यात
भूक आणि मृत्यू यांच्या छायेत
किती स्वतंत्र आहोत आपण !

**मरियम**

हाय ! जालीम सरकार

**जावेद** :

आपल्या बापजाद्यांच्या या भूमीवर
'स्वर्गादपि गरीयसी ' असलेल्या आमच्या जन्मभूमीवर
आता आम्हाला सुखाने श्वासोच्छ्वास करण्याचाही
अधिकार नाही
मी जेव्हा आपल्या घराकडे पाहातो
त्याच्या भिंती, दारे, खिडक्या बघतो
मोडकळीस आलेले त्याचे छप्पर पाहातो
तेव्हा असे वाटते
हे घर नसून तुरुंगाची कोठडी आहे

* भारताची कारागिरी खच्ची करण्यासाठी इंग्रजांनी येथील विणकऱ्यांचे अंगठे तोडून टाकले होते असे म्हणतात – अनुवादक

त्याच्या भिंतीतून काळोख पाझरतो आहे
हे घर कसले ?
आजार आणि रोग यांचे माहेरघरच
त्याच्या कोन्याकोपऱ्यांत नाना प्रकारच्या
गर्हणीय गोष्टी घडत-वाढत आहेत
परंतु अशीही माणसे या देशात आहेत
की ज्यांच्या नशिबी ही कोठडीही नाही
त्यांच्या डोकीवर आहे आभाळाचे छप्पर
आणि सभोवती आहेत ऊन, धूळ व पाऊस
रागाने फणफणणाऱ्या या पंचमहाभूतांच्या भिंती
कितीतरी स्त्रिया कुत्र्यांमांजरांप्रमाणे
गल्लीबोळांतून आपल्या मुलांना जन्म देत आहेत
आमच्यापेक्षा किडे-मुंग्या बऱ्या
त्यांच्या डोक्यांवर हिरवळीची छपरे आहेत
हिरव्यागार झाडांच्या थंड, दाट सावलीत
पक्ष्यांची सुंदर घरटी आहेत
साप-विंचूही आपापल्या बिळांत सुखाने राहातात
लांडगे-कोल्हे डोंगराच्या गुहांत
आणि जंगलातील झाडांखाली
ऊन, धूळ व पाऊस यांपासून सुरक्षित ठिकाणी
निवांतपणे झोपतात
परंतु मानव – नवनिर्मिती करणारा मानव
आज इंग्रजी राज्यात घर असून बेघर बनला आहे
ज्याने डोंगराळ प्रदेश, वाळवंटे व अरण्ये बनविली
माणसाने बागा फुलविल्या
आपल्या बाहुबळाने प्रासाद व महाल उभारले
त्याने रंगांमध्ये मखमलीची नवचिकता
आणि दगडाचे सौंदर्य निर्माण केले
आणि भिंतींना स्थैर्य शिकवून दिले
त्या इमारतींची दारे प्रियतमेच्या मांडीप्रमाणे

उघडी होत आहेत
पण या इंग्रजी राज्यात
जालीम इंग्रजांच्या राज्यात
आज नवनिर्मिती करणारा मानव
घरादाराला पारखा झाला आहे

**मरियम** :

हाय ! जालीम सरकार

**आबेद** :

तुझ्या वयाच्या किती तरी आया
कोळशाच्या व लोखंडाच्या खाणीत
आपल्या ढासळलेल्या यौवनाला मिठी मारून रडत आहेत
त्यांच्या मुलांची निरागसता हिरावून घेण्यात आली आहे
राक्षसी यंत्रांनी आपल्या लोखंडी दातांनी
त्यांचा आनंद कचाकचा खाऊन टाकला आहे
ही विशालकाय यंत्रे
माणसाने शेकडो वर्षांच्या परिश्रमातून निर्माण केली आहेत
तेव्हा कुठे त्याला हे पोलादी हात प्राप्त झाले आहेत
ज्यांच्या नाड्यांत विद्युत्‌लहरींचे रक्त सळसळत असते
त्यांनी मनात आणले तर ते
प्रचंड पर्वत उचलू शकतील
आकाशगंगेला जमिनीवर पसरवितील
कामाचे प्रचंड तास काही क्षणांमध्ये परिवर्तित करून
फुरसतीचा काळ वाढवितील
दारिद्र्य, बेकारी — सारे काही नष्ट करतील
मातीतून सोने, दगडातून परीस निर्माण करतील
पण या पोलादी हातांत आज 'भांडवला'ने
चांदीच्या बेड्या ठोकल्या आहेत
कारखान्यांच्या अंतःकरणातून धूर निघत आहे
आणि यंत्रांचे अवयव जखडले गेले आहेत
कठोर पोलादी नसांतील विजेचे रक्त गोठून गेले आहे

आणि रोगट 'भांडवलशाही'
रक्त पिऊन पिऊन ओकत आहे

**मरियम** :

हाय! जालीम सरकार

**आबेब** :

आज मानवाच्या या गुलामांच्या – यंत्रांच्या –
सामर्थ्यावर 'भांडवलशाही' किती घमेंड करीत आहे
यंत्रांच्या साह्याने ती मानवाच्या अंतःकरणाला
घरे पाडीत आहे
आणि फुरसतीऐवजी बेकारी पसरवीत आहे
काळ्याकुट्ट धुराच्या दाट ढगांतून ती
संपत्तीच्या मोत्यांचा नव्हे तर
दारिद्र्याच्या जंतूंचा वर्षाव करीत आहे
पाहा तर खरी
मजूर अंगांवर कपड्यांऐवजी आपलेच कातडे
ओढून कसे फिरत आहेत
भल्या सकाळी सूर्योदयाच्या वेळी ते
आपल्या काळोख्या बिळांतून बाहेर पडतात
आणि कारखान्यात जाऊन
आपले व आपल्या मुलांबाळांच्या हृदयातील रक्त
लाल रंगाच्या दारूत रूपांतरित करतात
आणि रक्त पिणाऱ्या भांडवलशाहीच्या
मद्यचषकात ते ओततात
संध्याकाळी त्यांना जळलेल्या राखेचा ढीग
बनवून कारखाने तो ढीग ओकतात
आणि मग रात्रीच्या वेळी ताप, क्षय व कर्करोग
यांनी ग्रासलेली ही भुते
मृत्यूच्या लांडग्यांप्रमाणे परत येतात
आणि उपाशी अंतःकरणे व सुकलेली हाडे
चघळून घशाखाली लोटतात

पाहा तर खरी
जुलमी इंग्रज़ी राज्यात
भूक व मृत्यू यांच्या छायेत
किती स्वतंत्र आहोत आपण !

**मरियम** :

हाय ! जालीम सरकार

**जावेद** :

आज 'भांडवलशाही' ती नखरेल सुंदरी नाही
जिच्या धाष्टर्यावर म्हातारी 'सरंजामशाही'
नाराज होती
जी वाऱ्याशी भांडत असे, वादळांशी खेळत असे
जी समुद्रात आपले केस धुवून
त्यात सूर्याचे किरण माळून
दिवसभर नाचत असे
अनोळखी देशांच्या अनोळखी किनाऱ्यांवर
खदखदा हसत फिरत असे
आजची 'भांडवलशाही' कुंटीण आहे
दलाली हा तिचा धंदा आहे
आता ते एक जिवंत प्रेत आहे
वर्षानुवर्षे सडणारे
तिच्या गोवऱ्या सरणावर पोचल्या आहेत
तिने आपल्या तरुणपणी स्वतःच्या चुकीने
किती मुलांना जन्म दिला आहे–
उपासमार, बेकारी, दारिद्र्य, दुष्काळ, रोगराई, अज्ञान, लोकभ्रम,
गरमी-परमा, कर्जबाजारीपणा
विषारी वायू आणि अणुबाँब
तिच्या मांडीवर वाढले आहेत
आता ही मुले मोठी झाली आहेत
जीवनाला ती शापरूप बनली आहेत
आणि 'भांडवलशाही'रूपी छिनाल थेरडी
त्यांच्या बळावर मानवतेचे रक्त पीत आहे

**मरियम** :

जुलूम-जबर्दस्तीवर ती जगत आहे

**जावेद** :

हिंदुस्थानात आज कोणीच सुखी नाही
पोटाला अन्न, हातांना काम आणि
अंग झाकण्यापुरते पटकूरही लोकांना मिळत नाही
रिकामे हात कुठवर बेकार राहाणार ?
आज ना उद्या ते तलवारी उचलतीलच
आज ओठ स्तब्ध आहेत
प्रीतीची चुंबने व तृप्तीची गीते
यांना ते आचवतील तर नाइलाजाने
क्रांतीची व बंडाची गाणी ते गाऊ लागतील
आणि स्वातंत्र्यगीते गाऊ लागतील
आज प्रत्येक नदीत वादळ उठले आहे
पर्वतांच्या उरांत खळबळ माजली आहे
प्रत्येक कण बंडास उद्युक्त झाला आहे
शेकडो धर्मयुद्धे खांद्याला खांदा भिडवून
पावले टाकीत आहेत
गोळ्या सं सं करीत आहेत, झेंडे फडकत आहेत
राजवाड्यात मृत्युशोक पसरला आहे
मृत्यूच्या छायेत जीवन नृत्य करीत आहे

**मरियम** :

शाबास !

**जावेद** :

नवे युग अवतरत आहे
संपत्ती, सुखसमृद्धी, आनंद, स्वातंत्र्य आणीत आहे
भूमीच्या उदरात अजून जन्माला न आलेली पालवी
नृत्य करीत आहे
शेते आनंदाने डोलण्यास उत्सुक आहेत

गहू व साळ यांची सुकुमार
जन्माला न आलेली रोपे
रंग व प्रकाश यांच्याशी खेळण्यास उत्सुक आहेत
माती ओरडून सांगते आहे की
"जहागीरदार व जमीनदार यांनी आपल्या
भ्रष्ट पावलांनी मला अपवित्र बनविले आहे."
काटयाकुटयांनी भरलेल्या व नापीक जमिनी
म्हणत आहेत, "गंगेच्या पाण्याने आम्हाला धुवून काढा
शुद्ध, पवित्र करा आम्हाला
म्हणजे मग आम्ही मखमली वस्त्रे लेवून
वसंतोत्सव साजरा करू."
आणि धरतीच्या पोटात, खाणींमध्ये
किती तरी धातू या कुशीवरून त्या कुशीवर होत आहेत
त्यांच्या गुणधर्मांत हालचाल व
अंतःकरणात अभिलाषा आहे
"कुणी तरी येऊन आम्हांला निसर्गाच्या कैदेतून सोडवा
आम्ही यंत्राच्या रूपाने माणसाची सेवा करू."
त्यांच्या डोळयांत एक स्वप्न तरळत आहे
रेशमाचे व सुती कापडांचे कारखाने
पिंजलेला, ढगांसारखा पांढराशुभ्र कापूस
नाचणारी रिळे, गुणगुणणाऱ्या चात्या
नानाविध रंगांचे ताणे-बाणे
जणू सूर्याचे रंगीत किरण
आपल्या लाखो लवचिक बोटांनी
आभाळावर इंद्रधनुष्याच्या सुरेख चादरी विणत आहेत

देशाच्या दगडांविटांत
जांभ्या दगडाच्या उंच टेकडयांच्या अंतःकरणांत
किती तरी महिरपी आळस झटकत आहेत
संगमरवराच्या उरात झोपलेले किती तरी
मनोरे, भिंती व दरवाजे

अस्तित्वहीनतेच्या अंधारात स्वतःला हरवून बसले आहेत
ते आज माणसाच्या निर्मितिक्षम
हातांची वाट पाहात आहेत
कारागीर व शिल्पकार त्यांना त्यांच्या
गाढ झोपेतून जागे करतील
दगड व विटा यांच्या ढिगाऱ्यांतून
प्रासाद व महाल निर्माण करतील
तर किती चांगले होईल !
आम्ही आहोत अजिंठ्याचे चित्रकार
वेरूळचे शिल्पकार
आणि ताजमहाल व शिक्रीचे वास्तुकार
आम्ही असे कारागीर आहोत की ज्यांची बोटे
दगडांनाही मेण बनवून
मुबक व मोहक आकृत्या निर्माण करतात
परंतु या बोटांना
दीडशे वर्षांच्या दारिद्र्याने व गुलामीने
दीडशे वर्षांच्या महारोगाने
खाऊन टाकले आहे
आज हिंदुस्थान जागा झाला आहे
हे सुंदर उद्यान जागे झाले आहे
याची मानवता व आत्मिकता जागी झाली आहे
आज मुले पाळण्यांतून रांगत रांगत बाहेर आली आहेत
आणि इंग्रजांकडे आपला हरवलेला निरागसपणा
परत मागत आहेत
स्त्रिया आपले गमावलेले शील
आणि आया सुकलेल्या स्तनातील ओलावा
यांची मागणी करीत आहेत
कारागीर आपले वळकट अंगठे
आणि शिल्पकार व वास्तुकार आपली चापल्ययुक्त बोटे
परत मागत आहेत

स्वातंत्र्ययुद्धात लढणारे सैनिक
कारखान्यांतील मजूर व शेतांतील शेतकरी
आपल्या नद्या, डोंगर, अरण्ये
आपला देश, मातृभूमी परत मागत आहेत
हा सुंदर बगीचा आमचा आहे
सारा भारत आमचा आहे
आम्ही आपल्या या मातृभूमीत
आपल्या या बगीचात
दुसरे काही नाही
फक्त जगण्याचा अधिकार मागत आहोत

## चौथे दृश्य

आजपासून रस्त्यावर येऊन मरणे बेहतर आहे
जुलुमाच्या सावलीत गप्प बसून जगणे हराम आहे.

'जाफरी'

## चौथे दृश्य

**इतिहासाचे गाणे :**

मी लाखो पावसाळे पाहिले आहेत
आगीची फुले, आगीचे बगीचे
डोळ्यांतील धगधगते निखारे
उसाशांच्या ज्वाळा व अश्रूंच्या ठिणग्या

रोम व ग्रीसचे गुलाम उठले
जणू पिंजऱ्यांतील वाघ बाहेर पडले
अत्याचाऱ्यांचे महाल डळमळू लागले
हात थरारले, मद्यचषक खाली पडून फुटले

आजपर्यंत दुमदुमत आहेत कानांमध्ये
गर्जना जागृत शेतकऱ्यांच्या
माझ्या आत्म्यात लपलेल्या आहेत
जखमा मध्ययुगीन उद्यानपालांच्या

मी पाहिल्या वर उठणाऱ्या
सुंदर तलवारी धर्मयोद्धयांच्या
माझ्या डोळ्यांसमोर ढासळल्या
प्रचंड भिंती कारागृहांच्या

माझ्या नजरेपुढून गेले
फ्रान्सच्या क्रांतीचे झेंडे
माझ्या छातीवर कोरलेल्या आहेत
बंडखोरांच्या जवान पावलांच्या खुणा

माझ्या नसानसांत, माझ्या रक्तात उसळतो
व्होल्गाचा लाल कढ
झळकते आहे माझ्या ललाटावर
रशियन क्रांतिकारकांचे दिव्य तेज

मी पाहिले आहेत लाखो पावसाळे
आगीची फुले, आगीचे बगीचे
डोळ्यांतील धगधगते निखारे
उसाशांच्या ज्वाळा व अश्रूंच्या ठिणग्या

**काळाचे गाणे :**

तू पाहिले आहेस लाखो वसंत ऋतू
या देशातील या खेपेचा वसंत ऋतू काही औरच आहे
दऱ्याखोरी दुमदुमत आहेत जयघोषांनी
धबधब्याचे सूर व ताल काही औरच आहेत

क्रांतीचा काफिला चालू लागला आहे
आनंदाची सनई वाजत आहे
भूकंपांनी थरारत आहे जमीन
डोंगरपर्वत आळस झटकत आहेत

पेटली आहे धडाडून क्रांतीची आग
बर्फाची शिखरे पेटून उठली आहेत
जुलूम व अत्याचार यांच्या काळोखात
शेकडो विजा चमचमत आहेत

शतकानुशतके ज्यांना पायदळी तुडविण्यात आले आहे
त्यांची अंतःकरणे आज धडधडत आहेत
जीवनाचे विझलेले निखारे
नव्या दिमाखाने धगधगत आहेत

पिकांच्याबरोबर उगवत आहे
शेतांतून बंडखोरांची सेना
तळपते आहे न्यायाची तलवार
मिळणार नाही अत्याचाऱ्यांना आसरा

कारखान्यांच्या पोलादी हृदयांतून
जणू एक पूर फुंफाटत आहे
लाल झेंडा, अरुणिमेचा रंग बनून
फडफडतो आहे वाऱ्याच्या छातीवर

हाच तो हिंदुस्थानचा किनारा
जेथे साम्राज्यशाहीच्या गर्वाचा डोलारा कोसळला
जणू पाण्याला आग लागली आहे
लाटांतून ज्वाळा उसळत आहेत

शिडे मोकळी झाली बंडाची
मुंबईच्या नाविकांना सलाम
साम्राज्यशाहीशी टक्कर घेणाऱ्या
त्या शूर वीरांना प्रणाम

शहरातील लोकांना रुबाब पाहण्यासारखा आहे
गोळ्या झेलताहेत छातीवर
ओठांवर जयघोष, नजरेत धर्मयुद्धाचा निश्चय
बंधनमुक्तीचे तेजोवलय ललाटावर

प्रत्येक रस्त्यावर समुद्राची भरती
प्रत्येक गल्लीत आहे तुफानी आवेश

साम्राज्यशाहीला बुडवून टाकील
माणसाच्या रक्ताचा हा पूर

रक्ताचा मळवट भरून आली आहे
तोच आहे काश्मीरी नववधूचा शृंगार
प्रत्येक कळी ठिणगी बनली आहे
फुलाच्या फांदीतून निघते आहे आग

या सुंदर केशरांच्या शेतांत
तशी तर दरसाल फुले उमलतात
या वर्षी निळ्या फुलांमध्ये
जखमाच जखमा हसत आहेत

सरोवर आहे हे कमळाच्या फुलांचे
निर्मळ, स्वच्छ याचे पाणी आहे
मिसळले आहे हुतात्म्यांचे रक्त त्यात
आज प्रत्येक लाट लालबुंद झाली आहे

हे आहे रणक्षेत्र त्रावणकोरचे
हे दख्खनभूमी, याचा तुला अभिमान वाटू दे
अरबी समुद्राच्या लाटांनो, आनंदाने नाचा
हे वीरभूमी, तू मुक्तहास्य कर

त्या उचलल्या गेल्या एक लाख बंदुका
एक लाख गोळ्या सूं सूं करू लागल्या
तुटून पडले ते एक लाख योद्धे
एक लाख वादळे घोंघावू लागली

एक लाख छातींमध्ये घुसल्या आहेत
तुटून पडलेल्या एक लाख तलवारी
निखळून पडल्या एक लाख शरीरांवरून
तुटलेल्या एक लाख बेड्या

हैदराबादच्या तरुणांची
फौज उतरली मैदानात
पुन्हा एकदा टिपूची लखलखती तलवार
रक्तात भिजून वर आली

विजेसारखा कडकडाट करीत
टोळधा आल्या शेतकऱ्यांच्या
कसा मुसळधार पाऊस कोसळतो आहे
विजयाची गाणी दुमदुमत आहेत

कोलाहल आहे, आवेश आहे, खळबळ आहे
सत्ताधाऱ्यांची पार गाळण उडाली आहे
हजार ज्वालामुखी जागे झाले आहेत
त्यांच्या मुखांतून आग उसळू लागली आहे

एका बाजूला जुलूम, दुसऱ्या बाजूला न्याय
या दोन सैन्यांची आपसात टक्कर झाली
ज्यांच्या हृदयांत बलिदानाचा जोष होता
त्यांची इच्छा आज पूर्ण झाली

वाहात आहेत तरुण शरीरातून
लाल व गरम रक्ताच्या चिळकांडधा
क्षितिजाच्या उरातून उडू लागली
जादूने भरलेल्या प्रकाशाची कारंजी

ही त्याच स्त्रियांची प्रेते आहेत
ज्यांच्या चेहऱ्यांवर रंग नव्हता की तेज नव्हते
आज त्यांच्याच ओटीत फुलू लागल्या आहेत बागा
त्यांच्याच पदरांवर वसंत ऋतूचे भरतकाम आहे

धुळीत झोपली आहेत जी मुले
आपल्याच रक्ताने न्हाऊन

'टॉमी 'कडे अत्यंत तिरस्काराने
पाहात आहेत नजर रोखून

ही देवाघरची फुले म्हणजे प्रतीके होती
आपल्या आईबापांच्या प्रीतीची
पण आजपासून ती स्मारके आहेत
राष्ट्राच्या व समाजाच्या शौर्याची

हे इतिहासा, मला काय विचारतोस
हिंदुस्थानचा नजराणा काय आहे म्हणून ?
या पेटलेल्या उपवनातून
एक-दोन लाल फुले घेऊन जा

**फिरंगी** :

तुला माहीत आहे, हे स्थान कोणते आहे ?

**आवेब** :

नाही !

**फिरंगी** :

हा तो प्रासाद आहे, ज्या ठिकाणी
न्याय, समता व सत्य यांचा दीपक
शेकडो वर्षापासून तेवत आहे
हा तो प्रासाद आहे, ज्याच्या छायेत
हिंदुस्थानची जनता सुखासमाधानाने राहात आहे
पाहा ना, भिंतीवर ब्रिटनचे राजे व हिंदुस्थानचे सम्राट
यांची शुभंकर तसवीर आहे
त्यांच्या डोळ्यांत दया व हृदयांत प्रेम भरलेले आहे
या चित्राजवळ ये
हात वर कर
आणि खरे बोलेन, अशी शपथ घे

**मरियम** :

आधी तू हे सांग
सत्य सहन करण्याची हिंमत तुझ्यात आहे काय ?

**जावेद** :

खरी गोष्ट अशी आहे की
न्याय, समता व सत्य यांचा दिवा
सरकारी महालात कधीच तेवत नव्हता

**मरियम** :

खरी गोष्ट अशी आहे की
इंग्रजांजवळ खरेपणा असा कधीच नव्हता
दगडही वितळून जावेत अशा वाळवंटात
फुले उमललेली आम्ही पाहिली नाहीत

**जावेद** :

खरी गोष्ट अशी आहे की
कोणीही भारतीय ब्रिटनच्या राजाचा प्रजाजन नाही

**मरियम** :

खरी गोष्ट अशी आहे की
इंग्रजांच्या दीडशे वर्षांच्या राजवटीत
एकाही माणसाला सुखसमाधान लाभले नाही

**जावेद** :

खरी गोष्ट अशी आहे की
ज्या या माणसाची ही पूजनीय तसबीर
या ठिकाणी प्रेताप्रमाणे लोंबकळत आहे
तो ब्रिटनचा राजा नाही अथवा
हिंदुस्थानचा सम्राट नाही
ती एक निव्वळ फसवणूक आहे, धूळफेक आहे
तो भ्रम आहे, केवळ कल्पना आहे

**फिरंगी** :

बडबड बंद करा, गप्प राहा
हे ब्रिटनच्या राजाच्या गुलामांनो, तोंडे बंद करा

तुमच्यावरील आरोपांची ही यादी ऐका
तुम्ही – जावेद व मरियम,
तुम्ही लोकशाहीशी संगनमत करून
क्रांतीची व बंडाची आग भडकविली
तुम्ही कोन्याकोपऱ्यात खळबळ माजविली
तुम्ही असे सांगता की, लोकशाहीची राजवट यावी
घराघरांत स्वराज्य निर्माण व्हावे
शेतांमध्ये शेतकऱ्यांचे राज्य असावे
कारखाने ही मजुरांची राजधानी व्हावी
तुमच्यावर असा आरोप आहे की
ब्रिटनचे राजे व हिंदुस्थानचे सम्राट यांच्या सरकारची
राजवटीची व कायद्याचीच नव्हे तर
शांतता व संस्कृती यांची पाळेमुळे खणून काढण्याचा
तुम्ही प्रयत्न केला आहे
थोडक्यात म्हणजे तुम्ही दुराचारी आहात

**जावेद** :

आमच्या दृष्टीने तू कोण आहेस, हे तुला माहीत आहे ?
तू आजच्या युगातील फिर्औन* आहेस
तू असा खुनी आहेस–
ज्याच्या मानगुटीवर एक-दोन नव्हे तर
लाखो, करोडो जीवाच्या हत्येचे पाप बसलेले आहे
तू असा महापापी आहेस की
खुद्द पापानेही तुझ्यापुढे शरमेने मान खाली घालावी

जेव्हा तू या देशात आलास तेव्हा तुला अतिथी समजून
आम्ही तुला डोक्यावर घेतले
भाऊ म्हणून तुला मिठी मारली
पण तू तर कपटमूर्ती निघालास

* फिर्औन हा इजिप्तचा प्राचीन युगातील बादशहा. हा अत्यंत घमेंडखोर व अत्याचारी होता.– अनुवादक

तू व्यापाऱ्याचे सोंग घेतले होतेस
पण तू तर पक्का मांग निघालास
तू भावाभावांत भांडण लावलेस
पाण्यासारखे रक्त वाहविलेस
आणि आपल्या कायद्यांच्या नावावर
प्रचंड किल्ले उभारलेस
तू सैन्य आणलेस
घरच्या मालकांवर पहारे बसविलेस
जुलुमाचे व अत्याचाराचे कोरडे लगावलेस
आणि हिंदुस्थानातील समृद्ध गावे लुटलीस
आपल्या उपकारकर्त्यांच्या रक्ताने ज्याचे हात
माखले आहेत, असा तू आहेस
ज्याला तू घटनेचे व कायद्याचे नाव दिले आहेस
ते काय आहे ते तुला स्वतःलाच माहीत आहे
वस्तुतः तो आहे एक भयंकर नाग—
शेकडो वर्षांपासून आशियातील व आफ्रिकेतील
जनतेला दंश करणारा
लंडनचे सरकारी गारुडी त्याला
आपल्या कपटांच्या टोपलीत घेऊन
वेगवेगळ्या देशांत फिरत आहेत
तो एक जालीम चाबूक आहे
त्याच्या मारामुळे झालेल्या जखमा
माणसाच्या शरीरात व आत्म्यात सडत आहेत
ती एक वीज आहे
जी वर्षानुवर्षे गरीबांच्या घरांवर कोसळत आहे
ती एक तलवार आहे
जी निःशस्त्र लोकांच्या सुकून गेलेल्या मानेवर
दीडशे वर्षांपासून वार करीत आहे
ती एक मखमल आहे
जिच्यात तुझे क्रूर व रक्तपिपासू

पंजे लपलेले आहेत
तू आपल्या कायद्याचे ढोंग तर छान रचले आहेस
आपल्या जुलुमी राजवटीसाठी चांगली सबब शोधली आहेस
पण या देशात असल्या कायद्याच्या
चिंधड्या उडाल्या आहेत
आम्ही आमच्या तडफडणाऱ्या हृदयांतील
उकळत्या रक्ताने आपल्या बेअब्रूचा व
परदास्याचा कलंक धुवून टाकला आहे
आता येथे एकच घटना, एकच कायदा आहे
लोकशाहीने क्रांतीच्या व बंडाच्या भट्टीत
वितळवून आपल्या दृढनिश्चयाच्या साच्यात ओतलेला

**फिरंगी** :

आणि जावेदची पत्नी मरियम
तुला काय म्हणायचे आहे ?

**मरियम :**

जेव्हापासून तू येथे आलास तेव्हापासून
घराचे सारे वैभवच गेले निघून

तू भारताच्या हिरव्यागार शेतांपासून
त्यांची सुपीकता घेतली आहेस हिरावून
तू या देशाच्या कुरणांपासून
त्यांचा ओलावा घेतला आहेस हिरावून
तू फुलांना उमलू दिले नाहीस
वाऱ्याला वाहू दिले नाहीस
झऱ्यांना झुळझुळ वाहू दिले नाहीस
कारंज्यांना नृत्य करू दिले नाहीस
आणि नद्यांच्या पाण्यात विष कालविलेस
काल ज्या ठिकाणी वसंत ऋतू बागडत होता
दुधाचे व मधाचे वर्षाव होत होते

त्या खोऱ्यात व मैदानात आज
दुष्काळाची व दारिद्र्याची भुते नाचत आहेत
आणि कायदा व सुव्यवस्था यांची गिधाडे
आमची आतडी फाडून खात आहेत

तुला माहीत आहे
आज तरुण कपोलांची कमळे का हसत नाहीत ?
चंद्रासारखे भाळ, सूर्यासारखे मुखडे
का तळपत नाहीत ?
तू बाल्यकाळरूपी फुलांचा सुगंध चोरलास
आणि तारुण्याच्या आरशाची दीप्ती पळवून नेलीस
तू हसऱ्या भांगातील शेंदूर
व प्रफुल्ल कपाळावरील कुंकू पुसून टाकलेस
चंदनी हातांवरील मेंदीचा रंग नाहीसा केलास

**आबेब** :

तरीही तू शांतता, संस्कृती व शिष्टाचार
यांचा जप करीत एक नवे जाळे पसरतो आहेस
साऱ्या जगाची दिशाभूल करतो आहेस

**मरियम** :

स्वत:च्या अंत:करणात डोकावून तू स्वत:लाच विचार
की शांतता व संस्कृती यांचा नाश कोणी केला ?
दु:खी मातांच्या धट्टयाकट्टया तरुणांना
तोफेच्या तोंडी कोणी दिले ?
शहरे आणि खेडी कोणी जाळली ?
कोणाची बाँबफेकी विमाने वर्षानुवर्षे
जगाच्या डोकीवर मृत्युगीते गात आहेत ?
कुणाच्या फौजा परदेशांत जाऊन
साथीचे रोग पसरवीत आहेत ?

स्वतःच्या अंतःकरणात डोकावून तू स्वतःलाच विचार
की कुणी थडगी उकरली ?
आणि प्रेते बाहेर काढली ?
त्या प्रेतांचे तुकडे कोणी केले ?
प्रेतांना कोरडे कुणी मारले ?
कायदा व सुव्यवस्था यांच्या नावावर
कोणी सूळ उभारले आणि फाशीचे गळफास तयार केले ?
आयांच्या कुशीतून कुणी त्यांची मुले हिसकावून घेतली ?
निरागस बालकांची छाती फाडून
त्यातील नरम, नाजूक, धडधडती हृदये कचाकचा चावून खाल्ली ?

स्वतःच्या अंतःकरणात डोकावून तू स्वतःलाच विचार
की देशात क्रांतीचे व बंडाचे वादळ कुणी उठविले ?
ज्याला तू गुन्हा समजतोस
तीच तर खरी संस्कृती आहे, सभ्यता आहे
अत्याचाऱ्यांच्या विरुद्ध बंड व क्रांती
ही मानवतेकडे जाण्याची शिडी आहे
होय, मानवतेकडे जाण्याची ती शिडी आहे

**जावेद** :

आम्हाला आमचे दास्य मान्य नाही
या देशातील एका कणावरही तुझा अधिकार नाही
आज झाडे पावले उचलू लागली आहेत
पर्वत चालू लागले आहेत
वाळवंटांच्या सुकलेल्या फिकट उरांतून
पूर वाहू लागले आहेत
धुळीच्या कुशीतून शेते डोकी वर काढत आहेत
या वर्षी शेतातील पिकांना विळे लागले आहेत
हजारो नव्हे, लाखो-करोडो हातोडे उचलून
कारखाने पुढे सरसावत आहेत

आणि पोलादी चक्रे–
काळ व इतिहास यांच्या वेगवान चक्रांप्रमाणे
क्रांतीच्या व बंडाच्या रथात स्वत:ला गुंतवून
विजयगीते गात आहेत

ती पाहा किती तरी सैन्ये क्षितिजावरून
वादळाप्रमाणे घोंघावत येत आहेत
जुलमाच्या डोक्यावर विजा चमकत आहेत
राहून राहून चमकत आहेत
कावेरीच्या किनाऱ्यावर आणि प्लासीच्या मैदानात
शेकडो वर्षांपासून झोपी गेलेले ते आत्मे आहेत
सत्तावन सालच्या बंडात ज्यांना तू आपल्या तोफांना
बांधले होतेस ती ही शरीरे आहेत
हजारो विहिरी व खड्डे ज्यांनी तू भरून टाकले होतेस
ती ही प्रेते आहेत
ज्यांना तू धडांपासून वेगळे केले होतेस
तीच ही शिरे आहेत
या त्याच माना आहेत ज्यांना तू
फाशीच्या फासात अडकविले होतेस
हे तेच हात आहेत ज्यांच्यावर,
लोखंडी बेड्यांचे डाग अजून कायम आहेत
हे तेच पाय आहेत ज्यांमध्ये
तू घातलेल्या बेड्या अजून कायम आहेत
या त्याच छात्या आहेत ज्यांच्यामध्ये
हृदयांच्या जागी शिशाच्या गोळ्या झोपलेल्या आहेत
ही तीच अंत:करणे आहेत ज्यांच्या प्रत्येक जखमेत
विषारी संगिनींची तुटलेली टोके रडत पडली आहेत

ती पाहा किती तरी सैन्ये क्षितिजावरून
वादळाप्रमाणे घोंघावत येत आहेत
जुलमाच्या डोक्यावर विजा चमकत आहेत

पळ, पळ !
आपले शरीर, आपला प्राण, आपले मन, आप
आपली संस्कृती व कायदे, सारे काही घेऊन प
या भूमीच्या धगधगत्या छातीवरून आपल्या
जुना सारीपट काढून घे
जीवन तुला विटले आहे
सारे जग कंटाळले आहे
मृत्यूची शिडे मोकळी कर आणि आपल्या जह
नांगर उचलून घे
जा. . . .जा !

**फिरंगी** :

याचा अर्थ असाच आहे
की तुम्हांला तुमचे सारे गुन्हे कबूल आहेत

**जावेद** :

आम्हाला ते मुळीच मान्य नाहीत

**मरियम** :

होय, मुळीच मान्य नाहीत

**फिरंगी** :

पण कायद्याच्या न्यायपूर्ण नजरेत
यालाच कबुलीजबाब म्हणतात

**जावेद** :

क्रांतीचा व बंडाचा आरोप आम्हांला मान्य
पण गुन्हे मात्र मुळीच कबूल नाहीत

**मरियम** :

मुळीच कबूल नाहीत

**फिरंगी** :

तुम्ही असेच नाकबूल करीत राहाल
पण कायद्याचा निर्णय हा निर्णय असतो

तुम्ही – जावेद व मरियम,
तुम्ही लोकशाहीशी संगनमत करून
क्रांतीची व बंडाची आग भडकविली
तुम्ही कोन्याकोपऱ्यात खळबळ माजविली
तुम्ही असे सांगता की, लोकशाहीची राजवट यावी
घराघरांत स्वराज्य निर्माण व्हावे
शेतांमध्ये शेतकऱ्यांचे राज्य असावे
कारखाने ही मजुरांची राजधानी व्हावी
तुमच्यावर असा आरोप आहे की
ब्रिटनचे राजे व हिंदुस्थानचे सम्राट यांच्या सरकारची
राजवटीची व कायद्याचीच नव्हे तर
शांतता व संस्कृती यांची पाळेमुळे खणून काढण्याचा
तुम्ही प्रयत्न केला आहे
म्हणून ब्रिटनचे राजे व हिंदुस्थानचे सम्राट
यांच्या न्यायालयाकडून तुम्हाला
जावेद, तुला
अशी शिक्षा फर्मावण्यात आली आहे की
सरकारने तुझा जिवंत राहाण्याचा अधिकार
काढून घेतला आहे

**जावेद** :

माझाच काय पण, तू येथे आल्यापासून
साऱ्या हिंदुस्थानचा हा अधिकार
काढून घेण्यात आला आहे

**फिरंगी** :

तुझा जगण्याचा अधिकार काढून घेण्यात आला आहे
आता तुझ्यासाठी कारागृहात रेशमी फास तयार आहे
त्या फासावर तुला तुझा जीव जाईपर्यंत
लटकावण्यात येईल
अशा प्रकारे ब्रिटनचे राजे व हिंदुस्थानचे सम्राट
यांच्या राज्यातून तुला नाहीसे करण्यात येईल

**जावेद** :

आणि तूही आम्हा गरीबांचा हिंदुस्थान
सोडून चालता हो

**फिरंगी** :

आणि तुला–
मरियम, तुला अशी शिक्षा देण्यात येत आहे की
तू जन्मभर नुसती रडत राहा
आपल्या अश्रूंनी आपली पापे धूत राहा
हा तो प्रासाद आहे, ज्या ठिकाणी
न्याय, समता व सत्य यांचा दीपक
शेकडो वर्षांपासून तेवत आहे
हा तो प्रासाद आहे, ज्याच्या छायेत
हिंदुस्थानची जनता सुखासमाधानाने राहात आहे

**मरियम** :

न्याय व सत्य यांच्या असल्या या प्रासादाचा
धिक्कार असो
असल्या जुलुमी सरकारचा धिक्कार असो
(बराच वेळपर्यंत हा आवाज घुमत राहातो)
धिक्कार ! धिक्कार ! धिक्कार !

# पाचवे दृश्य

**मृत्यूचे गाणे :**

प्रत्येक गोष्ट येते, प्रत्येक गोष्ट जाते
प्रत्येक रंग नश्वर असतो, प्रत्येक आकृती नश्वर असते
जग म्हणजे विस्कटलेल्या स्वप्नांचे निवासस्थान आहे
रंगतदार कथेचे कथानक मात्र व्यथापूर्ण आहे

अनादी वाद्याचे गीत मृत्यू आहे
जगत्‌रूपी दीपकाचा प्रकाश मृत्यू आहे
मृत्यूच्या पडछाया नाचत आहेत
मृत्यू अप्रकट आहे, मृत्यू जन्मलेला आहे

फुलाचा सुवास असो की ताऱ्यांचा प्रकाश असो
दृष्टीची लहर असो की विजेचा प्रवाह असो
सर्वांवर जादू चालते मृत्यूची
खूण प्राचीन असो की खूण नवीन असो

प्रत्येक फूल विवश आहे, प्रत्येक काटा विवश आहे
प्रत्येक वाद्य विवश आहे, प्रत्येक तार विवश आहे
माझ्या पंज्यातून कोणीच सुटला नाही
जपमाळ विवश आहे, जानवे विवश आहे

डोळ्यातील काजळ मी अश्रूंनी धुतले
सुखाला दु:खात बुडविले
कोणतीही नौका सुरक्षित निसटली नाही
सर्वांना बुडविले, सर्वांना बुडविले

कैदी आहेत गोरे, कैदी आहेत काळे
माणसे व जनावरे माझे घास आहेत
माझ्या मैफिलीत फिरत असतात
रक्ताचे प्याले, रक्ताचे प्याले

चंगीझ व तैमूर माझी हत्यारे
सम्राट व बादशाह माझे खंजीर
दुष्काळ व साथीचे रोग माझे झेंडे
जुलूम व दारिद्र्य माझे सैन्य

जग म्हणते, मी क्रूर आहे
माझी नजर थंड व निर्लज्ज
माझा वार जोरदार असतो
माझी पकड बळकट असते

परंतु फिरंगी माझ्यापेक्षाही वस्ताद आहे
माझ्यापेक्षाही क्रूर व निर्दय आहे
कारागृहाच्या भिंती भीतीने गर्भगळित झाल्या आहेत
फाशीचे फास तक्रार करीत आहेत

**मरियमचा आवाज :**

जीवन म्हणजे एक प्रचंड ओझे
माझा जावेद आहे तरी कुठे ?

**जावेद :**

ये, मरियम, माझ्याजवळ ये
तू माझी जिवलग, दु:खातील सहभागी आहेस

मी आहे गजांआड उभा
केव्हापासून पाहातो आहे तुझी वाट

( मरियम समोर येते

माझे कर्तव्य मी पूर्ण केले
माझा पोक मी पुरा केला
माझ्या मनावर कसलेच ओझे नाही
हिंदुस्थानचा मला अभिमान वाटतो
माझ्या अंतःकरणात भीती नाही की दुःख नाही
तुझे डोळे मात्र प्रीतीने डबडबले आहेत
एकच अभिलाषा बाळगली होती मी
तुझ्या कडेवर बाळ पाहाण्याची ( पुढे सरकून )

**मरियम** :

कुणी तरी पाडून टाका या तुरुंगाच्या भिंती
हे गज कुणी तरी काढून टाका

( गज गदगदा हलविते )

**जावेद** :

तुझे हे डोळे असे लाल का आहेत ?
तुझे केस असे विस्कटलेले का आहेत ?
तू अशी दुःखी, उदास का दिसतेस ?
तुझे तोंड असे उतरलेले का दिसते ?
तुझी नजर अशी निर्जीव का दिसते ?
तुझ्या हातात बांगड्या का नाहीत ?
तुझ्या चेहऱ्यावर खिन्नता आहे
तुझा स्वर कोमेजला आहे

**मरियम** :

माझ्या हृदयात तुझी प्रीती वसत आहे

**जावेद** :

माझी इज्जत तुझ्याच हाती आहे
आवर, आवर ते अश्रू
या बलिदानाला बट्टा लावू नकोस

**मरियम** :

पदर पसरून एकच मागणे मागते तुझ्याकडे
मलाही घेऊन जा तू तुझ्याबरोबर

**जावेद** :

माझ्याकडे पाहू नकोस, पाहा या बागेकडे
लुटल्या गेलेल्या या उपवनाकडे
माझ्या प्राणप्रिये, हिंदुस्थानकडे पाहा
उध्वस्त झालेल्या या देशाकडे पाहा
या बागेतल्या फुलांवर पानगळ ऋतूची कळा पसरली आहे
यातील प्रत्येक पान शोकग्रस्त आहे
पावसाळी ढग भरून येतील तर
या धुळीतून वसंत ऋतू फुलेल
अश्रूंची नाही त्याला गरज
हवे आहे त्याला रक्त गरम

**मरियम** :

माझ्याही डोक्यात आहे देशप्रेमाचा उन्माद
माझ्याही नसानसांतून सळसळते आहे गरम रक्त
मृत्यूचे बोलावणे मला आले असते
माझे रक्त कामी आले असते
तर किती बरे झाले असते !

**जावेद** :

हा मान तुलाही मिळेल पुढेमागे
तुझेही रक्त कामी येईल
असं फाशी जाणे म्हणजेच सर्व काही नव्हे
केवळ मरण म्हणजेच सर्व काही नव्हे
आणखीही आहेत पुष्कळसे मार्ग
देशाच्या, समाजाच्या, मातृभूमीच्या सेवेचे

**मरियम** :

आता मी कोणाच्या दागत जाऊन पडू ?
तुझा वियोग मला असह्य होईल
हाय ! उद्या तू खूप दूर असशील

माझ्या नजरेला दिसणार नाहीस
जीवनावर शोकाची छाया पसरेल
साऱ्या आनंदावर विरजण पडेल
दु:खे सहन करीन, आघात झेलीन
जन्मभर यापुढे एकटी राहीन
मला क्षणोक्षणी तुझी आठवण येईल
माझ्या स्वप्नात तू भरून राहाशील
माझ्या अश्रूंत तू चमकत राहाशील
माझ्या हृदयात तू धडधडत राहाशील
माझ्या अपयशाची मला लाज वाटते
तुझ्या बलिदानाचा मला अभिमान वाटतो
पण या मनाला मी कशी समजाऊ ?
तुला सोडून मी कशी जावू ?
या देशात जेव्हा स्वातंत्र्योत्सव साजरा होईल
तेव्हा मी गजबजलेल्या समाजात एकाकी असेन

जावेद :

उद्याचे स्वरूप काही वेगळेच असेल
नवी विटी नवे राज्य असेल
युद्ध नसेल की संघर्ष नसेल
आनंदाने तुझे मन फुललेले असेल
तुझ्या कडेवर एक चंद्र असेल
त्याच्यापुढे सूर्यही फिका दिसेल
जेव्हा तो मोठा होईल
तेव्हा त्यालाही बनव माझ्यासारखा
अशा प्रकारे तू मला परत मिळविशील
आणि एक क्षणभरही तुला उदास वाटणार नाही
किती मनोवेधक आहे ही कहाणी
नष्ट होऊनही उमलते ही जिंदगाणी

सारी मानवता म्हणजे एक धगधगीत निखारा आहे
आणि सारी माणसे त्याच्या ठिणग्या आहेत
त्यांच्याही हृदयात किती तरी तेजस्वी निखारे
लहानाचे मोठे होत असतात
या धगधगत्या निखाऱ्यातून
जेवढ्या ठिणग्या बाहेर पडतात
तेवढ्याच ठिणग्या त्या ठिणग्यांतून निघतात
अशा प्रकारे जीवनराणी
आपल्या ओटीत ठिणग्या भरून घेऊन
हरघडी एक नवा व दरवळणारा हार
आपल्यासाठी गुंफीत असते

काही ठिणग्या अशा असतात की
ज्या भडकत नाहीत, तडफडत नाहीत
त्या फक्त उडतात आणि क्षणभर नाचून
दुसऱ्याच क्षणी नाहीशा होतात
मृत्यूच्या थंडगार मांडीवर जाऊन झोपतात
पण अशाही अनेक ठिणग्या असतात की
ज्यांच्या उरांत निखारे धगधगत असतात
आणि ते केरकचऱ्यावर उड्या घेतात
आणि विझता विझताही ते जगाला व मानवतेला
रंग व तेज यांनी न्हाऊ घालतात
मानवसमाजातील उबदारपणा
काही एकाच निखाऱ्याच्या नृत्यापुरता
मर्यादित नसतो
मानवतारूपी उपवनात
आम्ही पहाटवाऱ्यासारखे येतो
घडीभर हिरवळीशी व फुलांशी गंमत करतो
फांद्यांवर झोके घेतो
लताकुंजांच्या सावलीत खेळतो

आणि फुलांना रंग व वास देऊन
या बागेचा नाचत नाचत निरोप घेतो

ढगांप्रमाणे आम्ही जगाच्या डोकीवर पसरतो
आणि मग हिरव्यागार शेतांना न्हाऊ घालून
दऱ्याखोरी, डोंगरपर्वत, वनअरण्ये, माळराने
यांना चिंब भिजवून गर्जना, गडगडाट व
वर्षाव करीत निघून जातो

आम्ही नेहमीच क्षणांसारखे येत राहिलो आहोत
आणि पुढेही येत राहू
काळाच्या अस्वस्थ, विस्तीर्ण उदरातून उसळून वर
येणाऱ्या आणि पुन्हा काळाच्या अस्वस्थ, विस्तीर्ण
उदरात बुडून जाणाऱ्या क्षणांसारखे !
तसे पाहिल्यास सारे क्षण सारखेच असतात
त्यांची गतीही सारखीच असते
त्यांचा झंकारही सारखा असतो
तरी पण ते समान नसतात, एकच नसतात
प्रत्येक क्षण ही एक नवी अभिलाषा असते
शोध घेण्याची एक नवी धडपड
एक नवे वाद्य एक नवे गीत
एक नवी ज्योत एक नवा प्रकाश

आम्ही आहोत मानवतेच्या कालखंडातील हंगाम–
जे बदलत राहिले आहेत
आणि बदलत राहातील
जे नवी फुले-फळे बरोबर आणीत राहिले आहेत
आणि आणीत राहातील
जे नवनवीन रंगांनी ताटवे सजवीत राहिले आहेत
आणि सजवीत राहातील

जे दरसाल नव्या पालव्यांचे नवे अंगरखे
आणून झाडांच्या अंगांवर चढवीत राहातील

आम्ही काळरूपी सागरातून लाटांप्रमाणे उसळत येतो
आणि असेच उसळत येत राहू
जीवनरूपी नौकेला आम्ही आपल्या तरल हृदयांवर घेऊन
पुढे पुढे जात राहिलो आहोत
आणि असेच पुढे पुढे जात राहू
या नौकेचे नावाडी अनादिकाळापासून बदलत राहिले आहेत
आणि पुढेही बदलत राहातील
शिडांच्या रूपाने माणसे फडफडत राहिली आहेत
आणि पुढेही फडफडत राहातील
मानवतेची ही सुरेख नौका अशीच चालत राहिली आहे
आणि पुढेही चालत राहील

आम्ही आहोत निर्माते मानवतेचे
आमचे बापजादेही निर्माते होते
आम्ही निर्माते आहोत
भावी काळातील पिढ्याहो निर्मात्या असतील
जीवनाचा गगनचुंबी प्रासाद असाच उभारला जात आला आहे
आणि उभारला जात राहील
आम्ही आमची कारागिरी जेथे पुरी करून निघून जाऊ
तेथूनच उद्या नव्या युगाचे उत्साही कारागीर
पुढे येऊन आपली कलाकुसर व कारागिरी सुरू करतील

आम्ही उद्या असणार नाही म्हणून काय
काळाची वेगवान गती थांबून राहील ?
जीवनाची कंबर दुःखाच्या ओझ्याने वाकून जाईल ?
चंद्र-ताऱ्यांच्या भ्रमणात काही फरक पडेल ?
जगावर काळोख पसरेल ?

उद्या आम्ही असणार नाही
पण जीवन आनंदाने हसत राहील
आपले दिवे तेवत ठेवील
आकाशाचा निळा रंग तेवढाच मनोहर राहील
आणि क्षितिजाचे भाळ प्रकाशाने चमकत राहील
आजच्याप्रमाणे उद्यादेखील
पृथ्वी आपल्या आसाभोवती फिरत राहील
आणि वातावरणाच्या असीम निळ्या अवकाशात
आजच्याप्रमाणे उद्याही डोलत राहील
तिच्याभोवती तारे आरती ओवाळतील
आजच्याप्रमाणे उद्याही पृथ्वी
तेजाच्या सरोवरात स्नान करील
आणि लाल सूर्याच्या आरशात बघून
आपले केस विंचरून वेणी घालील

होय, आज आणि उद्या यात एक फरक मात्र असेल
उद्याचे जीवन समृद्ध असेल
यशाची मदिरा पिऊन ते धुंद झालेले असेल
तुझ्या-माझ्यात अडथळा निर्माण करणारे
हे जाडजूड लोखंडी गज
उद्या वितळून जातील
जुलूम व अत्याचार यांच्या साऱ्या बेड्या
वितळून जातील
गुलामीतील दुःस्थिती, दारिद्र्यातील अप्रतिष्ठा
आपत्ती, कष्ट, व्यथा, हेवेदावे, अज्ञान
लोकभ्रमांचे साम्राज्य, पाशवी सवयी, हिंस्र पशूंसारख्या
क्रूर आवडी-निवडी व स्वभाव
हे सारे केरकचऱ्याप्रमाणे उद्या
मानवतेच्या पुरात वाहून जातील
मानवतेचा पूर अनादि काळापासून वाहात आला आहे

आणि अनंत काळपर्यंत तो वाहात राहील
या पुराच्या लोटात
निसर्गाचे हिंसाचार वाहून गेले आहेत
हा पूर हजारो नव्हे, लाखो वर्षांपासून
घोंघावत आलेला आहे
आणि घोंघावत राहील
ब्रिटिश सत्तेच्या पोकळ व जुनाट
खडकांशी टक्कर घेणारे आम्ही
आम्हीदेखील मानवतेच्या याच
शाश्वत सागराची एक लाट आहोत
जीवन, उत्थान व इतिहास यांची फौज आहोत
आम्ही पुढे सरसावलो तर इतिहास पुढे सरकेल
जुलूम व अत्याचार यांच्या शक्तींशी आम्ही लढू
आज आम्ही ज्या दिशेला वळू
त्याच दिशेला सारे जग वळेल
जीवन लाल पंख लावून अस्मानात भराऱ्या मारील

आम्ही पुराची अशी लाट आहोत की
जिला भरती आल्यावर ओहोटी कधी येतच नाही
लाखो दुष्मन असले तरी
आमची सेना मागे हटत नाही

जेव्हापासून मानवाने आपल्या पदचिन्हाने
जगाच्या पाठीवर श्रेष्ठत्वाचे ठसे उठविले आहेत
तेव्हापासून सारा निसर्ग
मानवतेशी दोन हात करू लागला आहे
मानवाला कोणी सहकारी, सहानुभूती दाखविणारा
त्याचे सांत्वन करण्यास कोणी नव्हते
चोहोकडे शत्रूच शत्रू दिसत होते
दऱ्याखोरी, अरण्ये, मैदाने, डोंगर

आपले पदर लपेटून बसले होते
राक्षसांप्रमाणे श्वासोच्छ्वास करणारे समुद्र
आपल्या प्रवाही शरीरांना फेसाच्या व लाटांच्या
चादरींमध्ये गुंडाळून बसले होते
अरण्यांनी आपल्या काळोख्या उरात
आपली सारी रहस्ये दडवून ठेवली होती
उंचउंच वृक्ष आपली मधुर फळे
माणसाच्या हाती लागणार नाहीत
इतक्या उंचीवर धरून उभे होते
डोंगराळ प्रदेशातील निळे खडक
आणि पृथ्वीच्या पृष्ठभागावरील सोनेरी थर
आपल्या पोटात प्रचंड संपत्ती दाबून बसले होते
नद्या क्रुद्ध होऊन फुंफाटत होत्या
नागिणींप्रमाणे सळसळत होत्या
विजा काळ्याभोर ढगांमध्ये आपल्या
आग ओकणाऱ्या जिभांनी फूत्कारत होत्या
भूकंप होत होते
बर्फ आणि आग यांची वादळे घोंघावत असत
आणि चंद्र, सूर्य, तारे त्यात दिसेनासे होत
परंतु या शेकडो शत्रूंच्या
शत्रुत्वाच्या काळोखात माणूस आपल्या हातात
प्रेम, कर्तव्य व जिज्ञासा यांची दिवटी घेऊन
दु:ख, व्यथा, शोक , अभिलाषा , आनंद, उत्साह, आशा,
आकांक्षा यांचे ओझे शिरावर घेऊन
पुढे पुढे जात होता
आणि प्रत्येक पावलावर सफलतेचे व यशाचे
झेंडे रोवत होता
अखेर दऱ्याखोरी, डोंगर, पर्वत, जंगले, अरण्ये,
शेते , माळराने त्याच्या पायांखाली
सतरंजीसारखी अंथरली गेली

त्याच्या विजयी पावलांच्या स्पर्शासाठी नद्या थांबल्या
उंचउंच वृक्षांच्या फळांनी भरलेल्या उंच फांद्या
त्याला प्रणाम करण्यासाठी खाली लवल्या
बर्फाची शिखरे त्याच्या स्वागतासाठी खाली वाकली
डोंगरातील संपत्ती
धबधब्यांची शक्ती
आणि जमिनीतील धनदौलत
त्याच्या सेवेस हजर झाली
मानव आकाशात विहार करू लागला
समुद्राच्या लाटांवर चालू लागला
वीज त्याच्या मुठीत आली
आणि जग मानवाच्या बुद्धीच्या तेजाने झळकू लागले
सभ्यतेने वाद्य हातात घेतले व संस्कृती गाऊ लागली
माणूस आजपर्यंत जे टप्पे, जे मार्ग, जे मुक्काम
पार करीत आला आहे त्यांची कल्पना कर
त्याच्या मार्गावर दोन्ही बाजूंना ढिगारे होते हाडांचे
आणि प्रत्येक पावलापावलावर
रक्ताने माखलेल्या , धडापासून वेगळ्या करण्यात आलेल्या
मुंडक्यांचे गगनाला स्पर्श करणारे डोंगर होते
त्यांच्या माथ्यांवर रात्रीच्या वेळी
भुतेखेते आपल्या सभा भरवीत
आणि आग पेटवून नाच करीत
इतिहासाच्या कुरणांमध्ये वाहाणाऱ्या रक्ताच्या
उग्र वासाने वारा गुदमरून जाई

या होत्या जुन्या काळच्या त्या सत्ताधीशांच्या पावलांच्या खुणा
ज्यांच्या अत्याचारांच्या हकीगतींनी
आजदेखील मनाचा थरकाप उडतो
परंतु माणूस या अवस्थांतून पार पडून
अशा मुक्कामावर येऊन उभा राहिला आहे की

ज्या ठिकाणी प्रत्येक पानगळ ऋतूच्या मागून
वसंत ऋतू पुष्पवृष्टी करीत आहे
आणि दुःखाच्या काळोख्या क्षितिजावरून
आनंदाचे तेजस्वी किरण रंग व प्रकाश यांनी
दऱ्याखोरी भरून टाकीत आहे
आपल्या या उजाड देशातील शेते हिरवीगार , टवटवीत होतील
भाताच्या लोंब्या हसू लागतील
गव्हाच्या लोंब्यांमध्ये तारे फुलतील, फळतील
आणि धरतीच्या वक्षस्थळातून
फुलांची कारंजी उडू लागतील

**मरियम** :

त्यांखाली आपण न्हाऊन निघू

**जावेद** :

आकाशातून उतरतील रंगीबेरंगी वसंताच्या पऱ्या
नाहीशा होतील दुष्काळाच्या भयानक सावल्या
चोहोकडे प्रकाशच प्रकाश पसरेल
प्रकाशच प्रकाश पसरेल

**मरियम** :

माझ्या जावेदाच्या तेजस्वी डोळ्यांचा प्रकाश
त्याच्या छातीतून वाहाणाऱ्या रक्ताचा रंग

**जावेद** :

कारखान्यातून गाण्याचे पूर वाहू लागतील
आणि गरीबांच्या सुकलेल्या फिकट चेहऱ्यांवर
जीवनाच्या खुशालीचा रंग पसरेल
त्यांचे उदास डोळे आनंदाच्या तेजाने चमकू लागतील

**मरियम** :

वियोगाच्या प्रदीर्घ रात्रींचे अश्रू

प्रीतीच्या सौम्य स्मितात
मध व साखर यांप्रमाणे मिसळून एकजीव होतील

**जावेद** :

धुळीने भरलेले आरसे धुवून निघतील
आणि आयांच्या कुशींतून चिमुकले हसरे देवदूत
खाली उतरून जमिनीवर चालू लागतील—
जणू बागेतील फुले, आकाशातील चंद्र—तारे
हिरव्यागार मखमली हिरवळीवरील निर्मळ दवबिंदू
आणि साध्या स्मिताला पारखी झालेली
चाळीस कोटी माणसे ज्वालामुखीच्या स्फोटासारखी
खळखळून हसतील
आणि हे हास्य – एका स्वतंत्र, निर्भय, उन्नतिशील
राष्ट्राचे हास्य तेजाच्या रूपाने
जमीन व आकाश भरून टाकील

**मरियम** :

साऱ्या जगाचे नंदनवन बनेल

**जावेद** :

खरे सांग, अजूनही तू दुःखी आहेस काय ?

**मरियम** :

होय, मी दुःखी आहे; अजूनही दुःखी आहे
अजूनही दुःखी आहे; हाय ! हे दुःख नेहमीच
माझ्या उरात राहात आले आहे
माझ्या रुदित नेत्रातून अश्रू बनून
ते ओघळत राहील
दगडांच्या उरातील वजन आणि
धगधगणाऱ्या लाल निखाऱ्यांच्या अंतःकरणातून उष्मा
हिरावून घेऊ शकेल असा कोण आहे ?
हृदयाच्या हिरव्या शाखेतून दुःखाचे बोचणारे काटे

वेचू शकेल असा कोण आहे?
हा नुसता वियोग नाही
ही हृदयाची अशी एक व्यथा आहे
जिच्या कळा जन्मभर माझ्या छातीत उठत राहातील
उसासे उरात गुदमरत राहातील

**आवेद** :

परंतु मानवाच्या आत्म्यावरील दुःखाचे डाग
काळाबरोबर हळूहळू धुतले जातात
जीवनरूपी नौकेची गुंडाळलेली शिडे
भावी आनंदाच्या थंड वाऱ्यांनी उलगडत जातात

**मरियम** :

तरी पण कायमचे दूर गेलेले स्नेही-साथी
पुन्हा भेटत नाहीत
होय, सांत्वनामुळे थोडा धीर येतो हे खरे
पण हृदयाच्या व आत्म्याच्या जखमा भरून येत नाहीत
रात्रीच्या काळोखात दवबिंदूंच्या चुंबनांनी
फुले धुंद होतात पण उमलत नाहीत
चंद्रकिरण जेव्हा आपल्या मऊ व नाजूक
रुपेरी बोटांनी रात्रीचे गुंता झालेले रेशमी केस
मोकळे करू लागतात तेव्हा तिच्या निळ्या धमन्यांत
चांदणे रक्तासारखे सळसळू लागते हे खरे
तरी पण तिच्या भाळावरील काळोखाच्या सावल्या
दूर होत नाहीत
होय, सांत्वनामुळे थोडा धीर येतो खरा
पण त्याच्या आधारावर आयुष्य व्यतीत होत नाही

**आवेद** :

ही केवळ शाब्दिक सहानुभूती नाही
ते एक सत्य आहे. ते तुझ्या कुशीत वाढत आहे
तुझ्या हृदयाला व आत्म्याला ते ऊब देत आहे

होय, हे खरे आहे की मी आज फाशीच्या फासाखाली
उभा आहे, पाने झडलेला वृक्ष आहे
तुला कितीही दुःख झाले तरी ते कमीच आहे
पण तू एक उमलते फूल आहेस
फळे येणारी फांदी आहेस
त्या फांदीच्या अंगावर जागजागी पालवी फुटत असते
तू उल्हासाचा संदेश आहेस
देश आणि समाज यांच्या आकांक्षेचा तुडुंब भरलेला प्याला आहेस
तू आपल्या उरात नव्या युगाचा शुभसंदेश बाळगला आहेस
जीवनाच्या ठेवीचे ओझे तू वाहात आहेस
.......... .......... .......... .......... ..........

( स्तब्धता )

( फक्त वाद्याचे सूर ऐकू येतात )

रात्री मला एक स्वप्न पडले
तुझ्या मांडीवर एक चंद्र होता
रात्र काळोखी होती आणि गजांच्या बाहेर
आकाश ढगांनी भरलेले होते
चोहोकडे होती स्मशानशांतता
जणू तुरुंगातील रात्रीच्या उरावर ठेवलेली एक शिळा

त्या एकांतात माझा सहकारी होता एक मिणमिणता दिवा
त्याने छतावर व भिंतींवर
अंधुक प्रकाशाचे एक जाळे पसरले होते
जणू निराशेच्या अंधारात लुकलुकणारा आशेचा प्रकाश
मी होतो, ही कोठडी आणि हे गज–
ज्यांच्या सावल्या अंगणातील धुळीवर झोपी गेल्या होत्या
इतक्यात निद्रादेवी आली
आपल्या डोळ्यांत शतकांचे काजळ लेवून
आपल्या पदरात सुखाचे तारे लपवून
तुरुंगाच्या पहारेकऱ्यांना चुकवीत

पावलापावलावर नववधूसारखी ठुमकत, लाजत
चाहूल ऐकताच भितीआड लपत
हलकेच कोठडीत आली आणि माझ्या छातीवर
तिने आपले डोके ठेवले
आपला काळाभोर दाट केशसंभार
तिने माझ्या खांद्यांवर पसरला
आकाशातून निळेसावळे ढग खाली उतरू लागले
आणि सावल्या पसरू लागल्या
चोहोकडे अंधार पसरला
संतरी, पहारेकरी, भुरकट भिंती, छत व गज,
दिवा आणि त्याचा मिणमिणता प्रकाश हे सारे
धुंद व झिंगलेल्या अंधारात गडप झाले
निद्रेच्या मादक मांडीवर झोपी गेले

निद्रा ही एक सुंदरी आहे
तिचे डोळे निळसर तांबूस आहेत
तिचे वक्षःस्थळ घनःश्याम आहे
तिच्या पापण्यांच्या छायेत
स्वप्नांच्या धुंद पडछाया खेळत असतात
ती गरीबांच्या दुःखात सहभागी होते
आणि दुःखी लोकांचे सांत्वन करते
सामाजिक विषमतेचा तिला तिटकारा आहे
ती रात्री येते
साऱ्या जगाला थोपटून निजविते
मुलांसाठी अंगाई गीते गाते
फुलांना कुरवाळते आणि साऱ्या जगावर
जादू भरलेल्या बोटांनी दवबिंदू शिंपडते
अशा प्रकारे निसर्गाच्या दरबारातील
प्रत्येक गोष्टीला ती एक नवे जीवन प्रदान करते
एक नवी टवटवी आणते

रात्री ती मला आपल्या हळुवार बाहूंमध्ये घेऊन
तुरुंगाच्या बाहेर पडली
दूर . . जाणीव व अनुभूती यांच्या सीमांपासूनही दूर
एका कल्पनालोकात ती मला घेऊन गेली
भूतकाळ व वर्तमानकाळ यांच्या अर्धनिद्रित खोऱ्यांमध्ये
त्या ठिकाणी स्वप्नांनी भरलेले धूसर प्रासाद होते
चांदण्यांचे खांब, तांबूस महिरपी
त्यांची ललाटे झुंबरांनी सजविलेली होती
तेथे हा तुरुंग नव्हता, तुरुंगाचे हे पहारेकरी नव्हते
या निर्दय , कठोर भिंती नव्हत्या
अथवा हा भीषण एकाकीपणा नव्हता
स्वप्नातील एकान्त माणसांनी गजबजून गेला होता
किती तरी विस्मृत चेहरे, विसरलेले डोळे
व्यतीत झालेले महिने व वर्षे
हसऱ्या क्षितिजावरून वर आली होती
स्तब्धतेच्या वाद्यावर किती तरी आवाज उमटत होते
एक अद्भुत नृत्य, अद्भुत संगीत चालले होते
मद्यचषकांची किणकिण, बासरीचे विरघळणारे सूर
वाऱ्यांच्या कानगोष्टी
हिरवळीच्या गालिच्यावर दवबिंदूंनी सजलेल्या वस्त्रांची सळसळ
चंद्रताऱ्यांची गाणी व ग्रहांची गुणगुण
काळाच्या पावलांची हळुवार चाहूल
हास्याचे फवारे व कळयांच्या उमलण्याचे आवाज
हे सारे एका धुंद गीतात विलीन झाले होते

इतक्यात रणदुंदुभी वाजू लागल्या
आणि कोटयवधी पावले एका तालावर पडू लागली
आकाश थरारले, जमीन हादरली, जीवन कळवळले
आणि हिमालय पर्वत आपल्या हातात
हिंदुस्थानचा झेंडा उंच धरून पुढे सरसावला

त्याच्या मागोमाग सारी मानवता
एका भयंकर पुराप्रमाणे वेगाने येत होती
साऱ्या भारतातील शूर योद्धे
आपली शिरे तळहातांवर घेऊन
आपल्या शत्रूशी टक्कर घेत होते
लाल व हिरवे झेंडे
तिरंगी झेंड्याच्या दोन्ही बाजूंना फडकत होते
गोळ्या सुटत होत्या
लाखो उरांतून उकळत्या रक्ताच्या नद्या वाहात होत्या
तरीदेखील हिमालय पर्वत
आपल्या हातात हिंदुस्थानचा झेंडा उंच धरून
पुढे सरसावत होता
शत्रूच्या सैन्यावर चढाई करीत होता
दुःखाने तळमळणाऱ्या मातांचे हुंदके
भुकेने कळवळणाऱ्या मुलांचे हुंदके
घोषणा, जयजयकार व ललकाऱ्या यांत बुडून गेले
चोहोकडून आवाज येत होता
" नवयुग कोठे आहे ?"
आणि मग एकदम आवाज आला
" नवयुग आले आहे. "
मी वळून पाहिले तर मला वेगळेच दृश्य दिसले
तुझ्या कडेवर एक चंद्र होता
आणि त्याचे ओठ हलत होते

" नवयुग आले आहे
मी आहे गौतमाच्या उरातील आवाज
मी आहे मानवाच्या प्रतिभेची भरारी
मी आहे टिपूची तलवार
मी आहे झांशीच्या राणीच्या स्वप्नांचे फलित
मी आहे हुतात्म्यांच्या मुखांवरील तेज

मी आहे भगतसिंगाचा आत्मा
मी आहे नव्या युगाच्या जलप्रलयातील
नोहाची नौका *
मी आहे चितगांवच्या बंडखोरांचे गाणे
मी आहे मुहम्मद अलीचे जीवन
मी आहे इकबाल व टागोर यांचे काव्य
मी आहे शेतकऱ्यांची व कामकऱ्यांची आरोळी
माझ्या रक्तात आहे गंगा–यमुनेची सळसळ
आणि नसानसांत आहे हिमालयाचे मुसमुसते यौवन
नवयुग आले आहे
नवयुग आले आहे
दूर हो हे साम्राज्यशाहीच्या महारोगा
जागा हो हे हिंदुस्थानच्या गुलामा
सूड ! सूड ! सूड ! सूड ! ''

हे उद्गार ऐकताच आभाळात विजा कडकडू लागल्या
आणि मी दचकून जागा झालो
रात्र काळोखी होती आणि
गजांच्या बाहेर आकाश ढगांनी भरून आले होते
तुरुंगाच्या उंच भिंतींवर विजा
आगीचे घोडे दौडवीत होत्या
आपले चाबूक कडाडत होत्या
ढगांनी भरलेल्या अंधाराच्या अंतःकरणात
सोनेरी गरुडांचे प्रचंड पंख चमकत होते
विजांचा कडकडाट व झगमगाट
मेघांचा गडगडाट हा वस्तुतः

* नूह किंवा नोहा या नावाचे एक पैगंबर होते. त्यांच्या काळी जलप्रलय झाला होता. त्यावेळी त्यांनी एका नौकेत प्रत्येक प्राण्याचे एकेक जोडपे घेऊन ती नौका किनाऱ्याला लावली. त्यामुळे जगाची पुन्हा उभारणी होऊ शकली, असे म्हणतात. यांना दुसरे आदम (आदिमानव) असेही संबोधण्यात येते–अनुवादक

बंड व क्रांती यांच्या अल्लड सुंदरीच्या
नूपुरांचा प्रचंड झंकार होता
अंधार व उजेड यांच्यांतील ते युद्ध होते
या युद्धातील तुच्छ सैनिक आम्ही आहोत

**फिरंगी** :

आता वेळ फारसा उरलेला नाही
तुम्ही आता भरल्या डोळ्यांनी एकमेकांचा
निरोप घेतला पाहिजे.

**जावेद** :

तो पाहा क्षितिजावर अंधार धडपडतो आहे
अरुणिमेच्या सोनेरी डोंगरामागे दिवस मावळतो आहे
आतापर्यंत संध्येचा पिवळसर रंगाचा पदर
वाऱ्यावर फडफडत होता
आकाश पुष्पवृष्टी ,करीत होते
परंतु आता एकाएकी लाल फुलांची प्रत्येक पाकळी
काळवंडली आहे
काळोखाच्या गुफेत प्रकाश लोपला आहे
आणि फिरंग्याच्या चेहऱ्यावर काळोखी
भीषण हास्य करीत आहे
त्याची नजर क्रोध व घृणा यांच्या निखाऱ्यांनी फुलली आहे
आणि बायकांसारखे घट्ट आवळलेले ओठ म्हणत आहेत
" आता वेळ फारसा उरलेला नाही "
आता आपल्याला भरल्या डोळ्यांनी एकमेकांचा
निरोप घेतला पाहिजे
हे माझ्या मरियम !
हे माझ्या मरियम ! (घाबरून)

**मरियम** :

दशदिशांना हा काळोख कसला ?

**जावेद** :

याच्या मागे लपली आहे प्रभात
जाऊन सांग माझ्या देशबांधवांना
आत्मा कुडीतून आनंदाने बाहेर पडला
हातात प्याला हिंदुस्थानचा
ओठांवर जयजयकार हिंदुस्तानचा

**मरियम** :

सारा देश मरायला तयार आहे
तुझी साथ करायला तयार आहे

**जावेद** :

ये, आणखी थोडी जवळ ये
उरातील बोचणी नाहीशी कर
तुला एकदा शेवटचे डोळे भरून पाहून घेऊ दे
तुझे निरोपाचे चुंबन मला घेऊ दे

(मरियमच्या हाताचा मुका घेतो)

**मरियम** :

अरे माझ्या जावेदा, तुला शेवटचा निरोप
मावळत्या सूर्या, तुला शेवटचा निरोप

(निघून जाते)

**जावेद** :

मरियम, माझ्या प्राणप्रिये, तुला शेवटचा निरोप
मानवा, मानवाच्या संताना, तुला शेवटचा निरोप
(त्याचा आवाज मरियमच्या पावलांच्या मागोमाग जातो)
जीवनाच्या वसंत ऋतूंनो, तुम्हांला शेवटचा रामराम
हे शाश्वत ठिणग्यांनो, तुम्हांला शेवटचा रामराम
आकाशस्थ दृश्यांनो, तुम्हांला शेवटचा रामराम
हे चंद्रा, हे सूर्या, हे ताऱ्यांनो, तुम्हांला शेवटचा रामराम
निळसर डोंगरांनो, तुम्हांला शेवटचा रामराम

हे रुपेरी झऱ्यांनो तुम्हांला शेवटचा रामराम
गुणगुणणाऱ्या वाऱ्यांनो, तुम्हांला शेवटचा रामराम
हे हसऱ्या वातावरणांनो, तुम्हांला शेवटचा रामराम
हे उषे, हे संध्ये, तुम्हांला शेवटचा रामराम
प्रियतमेच्या सौंदर्या, तुला शेवटचा रामराम
क्रांतिकारक तरुणांनो, तुम्हांला शेवटचा रामराम
हिंदरूपी बागेच्या माळ्यांनो, तुम्हांला शेवटचा रामराम
जेव्हा तुम्ही नव्या आराखड्यात रंग भराल
तेव्हा आम्हा हुतात्म्यांचीही आठवण ठेवा

## सहावे दृश्य

**या फांदीवरील फुले गळतही राहिली**
**याच फांदीला फुले लागतही राहिली**

**' इकबाल '**

## सहावे दृश्य

**मरियमचे शोकगीत**

हे माझ्या हिंदुस्थानच्या सैनिका
प्रीतीच्या मार्गावरील हे यात्रिका !

तुझी लाडकी मरियम तुला साद घालते आहे
तुला तिचीही आठवण कधी येते काय ?
तुला पाहाण्यासाठी माझे डोळे व्याकुळले आहेत
माझ्या तीसही रात्री काळोख्या बनल्या आहेत
हे उध्वस्त जीवन विषाच्या घोटासारखे वाटते आहे
हाय ! हे अश्रू काही वाहायचे थांबत नाहीत
दुःखाचा वरवंटा अधिकाधिक असह्य होत आहे
मनाची अस्वस्थता अधिकाधिक वाढत चालली आहे
अरे रुसून जाणाऱ्या, मी तुझी समजूत काढते
मी आहे तुझी मरियम , मी तुला बोलावते
तुझा देश अजूनही संघर्ष करतो आहे
अजूनही लाल थेंबांमुळे धुळीवर शेंदरी रंग चढलेला आहे
रक्ताने माखलेले झेंडे आळस झटकत आहेत. तू निघून ये
रणदुंदुभी वाजत आहेत. तू निघून ये.
माणसाने साद तरी कुठवर घालायची ?
निघून ये , निघून ये, निघून ये, माझ्या लाडक्या !

हे माझ्या हिंदुस्थानच्या सैनिक
प्रीतीच्या मार्गावरील हे यात्रिका !

माझ्या डोळयांत अजून पूर्वीसारखी चमक आहे
माझ्या ओठांच्या फुलांना अजूनही सुवास आहे
मी तुझ्या अभिलाषांची बाग आहे अजूनही
तुझ्या रसिक स्वप्नांचे मी निवासस्थान आहे अजूनही
माझ्या उरात आहे जीवनाचा निखारा
माझ्या कुशीत आहे स्वातंत्र्याचा तारा
आपल्या मस्तकाला सोनेरी मुंडावळी बांधून
तू एका व्यक्तीच्या डोकीवरील पदर वर उचलला होतास
हे तुला आठवते ?
माझ्या तळहातांना लग्नाची मेंदी लागलेली होती
चंदनी भांगात कलाबतूचा चुरा भरलेला होता
आणि आता हातांना मेंदी लागत नाही
हातात बांगड्या किणकिणत नाहीत
हाय ! ती मेंदी कुणी पळवून नेली ?
माझी सौभाग्यचिन्हे कुणी पुसून टाकली ?

हे माझ्या हिंदुस्थानच्या सैनिका
प्रीतीच्या मार्गावरील हे यात्रिका !

आठवत असेल तुला माझा लग्नातला लाल पोषाख
तू त्या वेळी केलेली प्रतिज्ञाही मोडलीस काय ?
माझ्या भकास अंतःकरणात केवढा अंधार पसरला आहे
माझ्या जगात कधी पहाट होईल काय ?
तू नाहीस म्हणून माझे मन कशातच रमत नाही
तुझी आठवण मला किती व्याकुळ करते हे मी काय सांगू ?
बसल्या बसल्या अश्रूंचे हार गुंफते
रात्रभर मी तुला ताऱ्यांमध्ये शोधते

पक्ष्यांची किलबिल ऐकून उरात कळ उठते
रंगीत ओढणी चोळामोळा करून फेकून देते

हे माझ्या हिंदुस्थानच्या सैनिका
प्रीतीच्या मार्गावरील हे यात्रिका !

हसतखेळत चांदणी रात्र आली
उन्हाळ्यानंतर जोराची वर्षा झाली
काळेभोर श्रावणमेघ भरून आले
आणि मग फाल्गुन-चैत्राचे वारे वाहू लागले
आंबराया पुन्हा मोहराने बहरल्या
कोकिळाने प्रीतीचा राग आलापिला
सगळे आले पण तूच एकटा आला नाहीस
आपल्या घरात आपल्या मरियमला तू विसरलास
तसे पाहिल्यास जगातली प्रत्येक गोष्ट नश्वर आहे
कालच्या घटना आज इतिसासात जमा होतात
पण अशी उपेक्षा कोणी करतात काय ?
प्रीतीचाही विसर कोणाला पडतो काय ?
संध्याकाळ होते आणि सूर्य मावळतो
सकाळ होताच पुन्हा सूर्य परत येतो
माझा सूर्य मात्र गेला तो परत आलाच नाही
माझ्या लाडक्याला परदेश का आवडला बरे ?

हे माझ्या हिंदुस्थानच्या सैनिका
प्रीतीच्या मार्गावरील हे यात्रिका !

नद्या धावत जाऊन सागराला मिळतात
तरुण मुली घागरीत रस भरून आणतात
रात्री कुशीत झोपतात चंद्र-तारे
भूमीचे चुंबन घेतात क्षितिजाचे किनारे

बागेत दुरून उडत येतात भ्रमर
फुलांना गीत आपले ऐकवितात भ्रमर
साऱ्या जगावर प्रेमाची पाखर आहे
निष्प्रेम जीवनात कसले सुख आहे ?

( एका स्त्रीच्या हसण्याचा आवाज )

हसते आहे कोणी माझी सखी कुठे तरी
आणि मी मात्र बसले आहे घरात एकटी
प्रीतीच्या फुलांनी आपल्या परड्या भरणाऱ्या
माझ्या समवयस्क मैत्रिणींना मी पाहाते
त्यांचे नेत्ररूपी तारे कसे चमकतात
त्यांचे कौमार्ययुक्त पदर कसे दरवळतात
राहून राहून त्यांच्या चोळ्या खुदुखुदु हसतात
त्यांच्या श्वासोच्छ्‌वासात रंगीत कळ्या उमलतात
त्यांच्या ललाटांवर चंद्र झळाळतात
त्यांची वक्षःस्थळे आहेत आनंदाचे सागर
माझ्या अंतःकरणातून बाहेर पडतात शुभेच्छांचे उद्‌गार
त्यांना त्यांचे वसंतऋतू सुखाचे जावोत
त्यांच्या अभिलाषांवर कधी विरजण न पडो
त्यांचे यौवन कधीही दुःखपूर्ण न होवो
त्यांची शेती हिरवीगार राहो
त्यांचे सौभाग्य अखंडित राहो,
मुलांबाळांनी त्यांची ओटी भरलेली राहो

हे माझ्या हिंदुस्थानच्या सैनिका
प्रीतीच्या मार्गावरील हे यात्रिका !

आनंदात घालविलेल्या त्या जुन्या दिवसांची आठवण
माझे सौंदर्य व प्रीती आणि तुझे यौवन
हे सारे परत येत असलेले मला दिसते

ओठांतल्या ओठांत हसत मी ते पाहाते
वातावरणात नानाविध रंग उधळत असतात
जणू शेकडो फुलपाखरे उडत असतात
व्यतीत झालेल्या रात्रींची वादळे उरात लपवून
क्षण उडतात हातात पेटल्या मशाली घेऊन
दिवसांचे झाले आठवडे, आठवड्यांचे महिने
काळाच्या नौका अशाच चालत राहातात
जीवन एक नवा रंग भरते
अल्लड यौवन माता बनून स्मित करते
स्वप्नात कोणी तरी मला साद घालतो
माझ्या कुशीत कोणी तरी चुळबुळ करतो
जणू ढगात वीज चमचमते
जणू रुपेरी वाळे रुणझुणतात
झऱ्याच्या पाण्यासारखा तो सळसळतो
जणू अस्वस्थ नसानसांत मळमळणारे यौवन
मुंग्या चालाव्यात तसा भास होतो शरीरात
राहून राहून कळा उठतात ओटीपोटात
जीवनाचे नवे फूल उमलायचे आहे
माझ्या धीराचे फळ मला मिळायचे आहे
मला वाटते तो अगदी; बेहूब तुझ्यासारखा असेल
माझ्या बाळपणीचे स्वप्न साकार होणार असेल
त्याच्या चेहऱ्यावर असेल वलय प्रीतीचे
त्याच्या भाळावर असेल तेज तुझ्या ललाटाचे
तुझा वियोग यावेळी अगदी असह्य होत आहे
हाय ! हा आनंदही असाच अपूर्व राहील काय ?
तो आपले डोळे उघडल्यावर कोणाला पाहील ?
हाय ! बाबा म्हणून तो कोणाला हाक मारील ?
मला भेटायला ये, असे मी म्हणत नाही
पण आपल्या बाळाला एकदा पाहून तर जा

तो माझ्या जिवाचा कलिजा, माझा छबडा
त्याला बापाची माया मिळणार नाही काय ?

हे माझ्या हिंदुस्थानच्या सैनिका
प्रीतीच्या मार्गावरील हे यात्रिका !

माणसाने साद तरी कुठवर घालीत राहायचे ?
निघून ये, निघून ये, निघून ये माझ्या लाडक्या !

( जासूद येतो )

जावेद आणि मरियम यांचे घर हेच काय ?

**मरियम** :

होय ! पण मला सांग, काय बातमी आहे ?
तुला मी आपला समजू की परका समजू ?
हे जासुदा, तू कुणाचे पत्र आणले आहेस ?
मरणाचा प्याला आहे की जीवनाचा ?
दुःखाचा निरोप आहे की आनंदाचा ?

**जासूद** :

जीवन आहे दुःखांची कहाणी
मृत्यूचा राग कधी संपतच नाही
मृत्यूची सावली असते चराचरावर
मृत्यूची पावले चालतात त्रैलोक्यावर
मृत्यूचा रंग आहे मातीत व पाण्यात
मृत्यू झोपतो फुलांच्या हृदयात
मृत्यूपासून सुटका नाही कुणाचीही
आज त्याची पाळी तर उद्या आमचीही
परंतु असेही काही मरणारे असतात
जे आपल्या आईची कूस धन्य करतात
ते अंधाराला भीत नाहीत

सुळावर चढूनही मरत नाहीत
साहस व धैर्य यांचे ते पुतळे असतात
मृत्यूचे डोके पायदळी तुडवून ते निघून जातात
मृत्यू त्यांच्यासमोर थरथरतो
मृत्यूची गाळण उडते त्यांच्या आठवणीने
ते आपले जीवन देशावरून ओवाळून टाकतात
मृत्यूला पाहून ते तुच्छतेने हसतात
त्या हुतात्म्यांचे उपवन सदैव टवटवीत असते
त्यांचे नाव चिरकाल उज्ज्वल राहाते

**मरियम** :

तू घेऊन आला आहेस मृत्यूची बातमी
हाय ! माझे सर्वस्व लुटले गेल्याची

**जासूद** :

तुझा नवरा इहलोकातून निघून गेला
आता तो आहे आकाशातील तारा
हिंदुस्थानला त्याचा अभिमान आहे, याचा तू आनंद मान
आजपासून तो अमर झाला

**मरियम** :

काय म्हणालास ? तो अमर झाला ?
खरे सांग, माझा नवरा कुठे आहे ?
त्याने प्रीतीचे अमृत प्राशन केले होते
परत येण्याचे आश्वासन दिले होते
तुझ्या हाती त्याने काही निरोप धाडला आहे ?
माझ्यासाठी एखादे पत्र दिले आहे ?

( पत्र दाखवून )

**जासूद** :

हा आहे त्याचा शेवटचा निरोप
पण कुणा दुसऱ्याच्या नावे आहे तो

**मरियम** :

माझ्याशिवाय त्याचा दुसरा कोण आहे ?
माझ्या मनात अशी चलबिचल का होत आहे ?
मी त्याला दिले माझे सारे यौवन
अभिलाषा, मोहकता, प्रसन्नता
माझ्या ओठांतील सारा रस त्याला दिला
उरातील भावोद्रेक त्याला दिला
त्याच्या आत्म्याला मी जागे केले
त्याच्या वैराण हृदयात जीवन फुलविले
त्याच्या उपवनाला मी सुवास दिला
सौंदर्याचा ठेवा त्याच्या स्वाधीन केला
त्याच्या प्रणयाची तहान मी भागविली
काळोख्या घरात पणती पेटविली
त्याच्या भावभावनांची मी प्रतिनिधी आहे
त्याच्या छोट्या बाळाची मी आई आहे

**आलूब** :

त्याच्या प्रेमाचा हा संदेश आहे
तुझ्या मुलाच्या नावानेच हे पत्र आहे

**मरियम** :

माझा मुलगा ? पण तो आहे कोठे ?
अजून माझ्या उदरातच लपलेला आहे तो
तुझे बोलणे त्याला कसे ऐकू जाणार ?
जावेदचे पत्र तो कसा वाचणार ?

**आलूब** :

तो जो उदरात अजून लपलेला आहे
तो नव्या युगाचा शिलेदार आहे

हे पत्र आहे धैर्य व आवेश यांचा संदेश
हे पत्र आहे नव्या पिढीच्या नावे लिहिलेले
येऊ घातलेली ती नवी पिढी
काळाचे रक्त तापवीत आहे
तुझ्या नवऱ्याने मरण्यापूर्वी
हे पत्र लिहिले होते स्वतःच्या रक्ताने
तो काळोखाला भीत नाही
सुळावर चढूनही मरत नाही

**परिखम** :

हिंदुस्थानला त्याचा अभिमान वाटावा असा तो
आहे, याचा मला अत्यंत आनंद होतो
आजपासून तो अमर आहे
तो अमर आहे
जीवन अमर आहे
आकांक्षा अमर आहे
सौंदर्य अमर आहे, प्रीतीही अमर आहे
माझा बाळ
माझा बाळ
तोही अमरच आहे
माझा पती
माझा जावेद
हिंदुस्थानला अभिमान वाटावा असा आहे
जमीन व अस्मान यांना हे ओरडून सांग
साऱ्या जगाला जाऊन हे सांग
तो मला विसरलेला नाही
प्रीतीच्या खुणा त्याने पुसून टाकलेल्या नाहीत
नव्या युगाला बोलावण्यास तो गेला आहे
चंद्र-सूर्य आणायला तो गेला आहे
तो येईल, नक्कीच येईल

सुप्रभात बनून तो सर्वत्र पसरेल
गुलामीचे बुरूज जेव्हा ढासळतील
हर्षाचे झेंडे जेव्हा फडफडतील
हास्याच्या फवाऱ्यातून रागिणी निर्माण होईल
एक स्वतंत्र जग जन्माला येईल
त्यावेळी तो हसत-हसत येईल
आपले तेज फाकत येईल
त्याने येण्याचे आश्वासन दिले आहे
माझ्या प्रीतीचे अमृत प्राशन केले आहे
तो येईल, नक्कीच येईल
सुप्रभात बनून तो सर्वत्र पसरेल

(आत्मविस्मृत होऊन उभी राहाते)

जासुदा, जासुदा. . . . माझा पती
फाशीवर चढताना काय म्हणाला ?
त्याने माझी आठवण काढली होती काय ?
माझे नाव त्याने घेतले होते काय ?

**जासूद** :

होय घेतले होते, तुझे नाव घेतले होते
मरताना तुझ्या प्रीतीचे अमृत त्याने प्राशिले होते
फाशीच्या दोराचे चुंबन घेऊन
येणाऱ्या प्रभातकाळाचे त्याने सूचन केले होते
त्याच्या चेहऱ्यावर आगळाच रंग दिसला
आणि तो ओठांतल्या ओठांत हसला
आणि त्याने खणखणीत आवाजात गर्जना केली :—
मृत्यूमुळे हा प्रवाह खंडित होईल काय ?
सगळे तारे सूर्याचे रूप घेऊन येतील
फुले बनून फुलतील निखारे
मृत्यूचे महापूर येवोत
अत्याचारांचे ढग वाटेल तेवढे पसरोत

रात्र कितीही काळोखी होवो
आकाश डोळ्यांना दिसेनासे होवो
पण अंधार वितळून जाईलच जाईल
सकाळी सूर्य उगवेलच उगवेल

फुलांना उमलण्यापासून कोण अडविणार ?
येणाऱ्या युगाला कोण अडविणार ?
हे सरकार, या जुलुमी सरकारचे हे जुलुमी डावपेच
हिंदुस्थानातील गुलामांचे लाखो-करोडो
गळे दाबून टाकतील काय ?
हे तुरुंग, या तुरुंगाचे पापी, अत्याचारी तुरुंगाधिकारी
या फौजा, या तोफा, या बंदुका, संगिनी, बॉंबगोळे
हिमालयापासून सिलोनपर्यंत आणि बंगाल-आसामपासून
काश्मीरपर्यंत साऱ्या हिंदुस्थानला
हिंसेच्या नरकाच्या रसरसत्या भीषण आगीत ओतून देतील
पुढे सरसावणाऱ्या मानवाच्या नव्या पिढीलाही
ते अटकाव करतील ?
होय, सांगा त्यांना

छातीत हृदयात संगिनी भोसका आणि
मानवाच्या शरीरात, आत्म्यात लाखो छेद करा
पण आता तो क्षण येऊन ठेवला आहे की
प्रत्येक जखमेतून हजारो जिव्हा निर्माण होतील
आणि त्या नद्यांना, डोंगर-दऱ्यांना, अरण्यांना
माळरानांना, घरादारांना, विटांना-दगडांना
प्रत्येक कणाला बंडाचा संदेश देतील
आणि मातेच्या कुशीतून मूल बाहेर यावे त्याप्रमाणे
या फाशीच्या व तुरुंगांच्या मागे पेटलेल्या क्षितिजावर
खवळलेल्या लाल रक्ताच्या समुद्रातून
लाटांची बेचैन छाती फोडून
लाल, स्वतंत्र जगाचा सूर्य बाहेर येईल

मरियम :

जसा काय जावेद व मरियम यांचा बाळच
मृत्यूचे लाखो महापूर येवोत
अत्याचारांचे ढग वाटेल तेवढे पसरोत
रात्र कितीही काळोखी होवो
आकाश डोळ्यांना दिसेनासे होवो
पण अंधार वितळून जाईलच जाईल
माझा बाळ. . . .
काय म्हणाले मी ?
माझा बाळ ?
माझा पती ?
माझा सूर्य उगवेलच उगवेल
हे जासूदा, पत्र वाचून दाखव
या झोपलेल्या जगाला जागे कर
जुने युग निघून जाऊ दे
नव्या युगाची तुतारी वाजू दे

( पत्र वाचून दाखवितो )

जासूद :

प्रीतीच्या इवल्याशा अग्निकणा, सलाम
काळोखातील प्रकाशमान ताऱ्या, सलाम
अजून आईच्या कुशीत तू दडलेला आहेस
अजून जीवनापासून तू फार दूर आहेस
तुझे अस्तित्व अजून अंधारात हरवलेले आहे
तुझे डोळे व कान अजून अप्रकट आहेत
तुझ्या डोळ्यांना बाहेरचे काही दिसत नाही
अजून मातेचे उदर हाच तुझा पाळणा आहे
अजून तुझे अस्तित्व प्रकट झालेले नाही
फक्त रक्ताच्या अभिसरणातच तू विद्यमान आहेस

अजून रंगरूप आकार धारण करीत आहेत
जग त्यांचीच प्रतीक्षा करीत आहे

महिने व वर्षे यांचे कालचक्र तुला लखलाभ होवो
तुझे अवयव लौकरच आकार धारण करतील
तुझ्या अस्तित्वाचे फूल उमलेल
तुझ्या आईचे हृदय आनंदाने भरून येईल
तुझे शरीर ती धष्टपुष्ट बनवील
तुला ती अमृत पाजील
तुझ्या अंतःकरणात तेजाची आकांक्षा स्फुरेल
तुझ्या श्वासोच्छ्वासात जीवनाचा उल्हास असेल
वारे येऊन तुला कुरवाळतील
रात्री व दिवस तुला अंगाई गीते गातील
तुला पाहून चंद्र खुदकन् हसेल
खुणा करून तुला तो बोलावील
तू आश्चर्याने ताऱ्यांकडे टकमका पाहाशील
ते तोडून हातात घेण्यासाठी तू झेप घेशील

याच विचाराने मी मनात आनंदाने हसतो
तुला जीवन प्रदान करून मी जातो

माझ्या आयुष्याचा दिवस ढळला, संध्या आली
मृत्यूने माझ्यासाठी विषाचा प्याला आणला आहे
मला नाही भीती मृत्यूच्या रात्रीची
मला दुःख आहे एकाच गोष्टीचे
की तुला वारसा म्हणून जे जग मिळेल
ते पाहून तू व्यथित होशील
तुझ्या भूतकाळाचे स्वरूप हे आहेः—
दुर्घटनांची वादळे, आपत्तींची रात्र
द्वेषाची गीते, मनोमालिन्याची वाद्ये
रक्ताचे समुद्र, अत्याचारांची गलबते

तरीदेखील जीवन ही एक मौल्यवान वस्तू आहे
जीवन हे खळेखळा वाहणारे यौवनाने मुसमुसलेले आहे.

तुझे मद्य नवीन, तुझा मद्यघट नवा
माझ्या लज्जेचे डाग तू धुऊन काढशील
खडकांच्या छातीवरून तू मार्ग काढ
पण आपल्या भूतकाळावरही नजर ठेव
तुझे धैर्य कायम टिकले पाहिजे
तुझा उत्साह कधीच मावळता कामा नये
तारुण्य म्हणजे भावनांचा अग्नी
तो आहे अभिलाषांचा अग्निराग
या अग्निरागाचा विसर पडू देऊ नको
भावनांची आग विझवू नको
स्वत:च्या रक्ताने ती पेटत ठेव
लोभाच्या वाऱ्यापासून तिचे रक्षण कर
तुझे भाळ त्या आगीच्या प्रकाशात चमकत राहो
तुझी दृष्टी त्या प्रकाशाने तेजस्वी बनो
याच अग्नीत तावूनसुलाखून तू तेजस्वी बनशील
काळाच्या क्षितिजावरून तू वर येशील
आपले जिज्ञासेचे डोळे तू कधी झाकून घेऊ नकोस
संशोधकवृत्तीचे जाळे कधी तुटता कामा नये
मी तुला सांगतो जीवनाचे रहस्य
कर्म हाच जीवनाचा ईश्वर होय
कर्मासाठी वातावरण अनुकूल आहे
मानव शिकारी आहे, जग ही शिकार आहे
वादळे आली तरी भिऊ नकोस
आपत्तीतही सुस्कारा टाकू नकोस
उत्साहाची प्रवृत्ती कधी कमी होता कामा नये
आकाशावरील दृष्टी ढळता कामा नये
आपत्तींना तोंड देऊन पुढे जात राहा

संकटांच्या बेड्या तोडून पुढे जा
रात्र काळोखी असते हे खरे
पण तीच रात्र ताऱ्यांचे मोती गुंफते
जगाची ही रीत पूर्वीपासून चालत आलेली आहे
काळोखाच्या कुशीत प्रकाश वाढत असतो

हृदयात असेल आकांक्षेची धुंदी
तर जीवन असते रंगाचे व तेजाचे गीत
सुख असते लपलेले दगडा-धोंड्यात
वातावरणात, रानावनात
वारा वाजवितो जेव्हा सतार
डोंगरांवर गानात जेव्हा झरे
हिरवीगार होऊन जेव्हा डोलतात शेते

भर उन्हात जेव्हा वाळू चमकते
किरण उगवतो जेव्हा आभाळातून
पालवी फुटते जेव्हा धुळीतून
क्षितिजावरून उसळतो जेव्हा रंग व प्रकाश
हवेत उडतात जेव्हा पक्षी
तेव्हा हृदयात वाजते आनंदाची सारंगी
सुख येऊन पाजवते आनंदाची मदिरा

ही नदी, हे खोरे, हे मैदान, हे फूल
सुखाने धाडलेले आहेत हे रसूल *
कोणतीही गोष्ट तुच्छ नाही जगात
ओठांवरील स्मित, नजरेतील तीर
काट्याकुट्यांवरील हे दवाचे थेंब
ही भिंतीवरून खाली उतरणारी सावली
फांद्यांवर हसणारी ही पालवी
हे पाण्याचे झरे, या पायवाटा

---

* प्रेषित; पैगंबर

ही कोळयाची जाळी, या चांदीच्या तारा
हा झाडांच्या गळ्यातील फुलांचा हार
वादळे व महापूर यांच्याहून हा कमी नाही
समुद्राच्या भरतीहून तो कमी नाही
या सर्वांच्या मिश्रणाने बनले आहे जीवन
या साच्यात ओतले गेले आहे जीवन

जीवनापासून कधी पराङ्मुख होऊ नकोस
कर्तबगारीने त्याला अनुकूल घे करून

मानव शिकारी आहे, जग शिकार आहे

# उपसंहार

हा आहे मानवाचा मार्ग — जीवनाचा राजमार्ग
हजारो वर्षांचे प्रचंड ओझे शिरावर घेऊन
उभा आहे
ज्याच्या ललाटावर भाग्यदेवतेने लिहिला आहे
आपला लेख
शेकडो पदचिन्हांना त्याने आलिंगन दिले आहे
व्यतीत होणाऱ्या काळाच्या धुळीच्या ढिगाऱ्याखाली
सुंदर शरीराचा झगमगाट लपवून तो बसला आहे
गतकाळातील संस्कृतीचे टप्पे त्याने
तरुण मातेप्रमाणे कुशीत झोपविले आहेत

हा आहे मानवाचा मार्ग — जीवनाचा राजमार्ग
हजारो वर्षांचे प्रचंड ओझे शिरावर घेऊन
उभा आहे
या मार्गावरून गेले आहेत चंगीझ, नादिर व तैमूर
रक्तात भिजविलेल्या मशाली पेटवून
गुलाम आणि दासी यांचे तांडे आले
आपल्या स्वतःच्या रक्तात न्हालेले व बुडालेले
मोडून पडलेल्या खांद्यांवर चीनची भिंत घेऊन
आणि शिरांवर ईजिप्तचे प्रचंड पिरामीड उचलून
शेखांचा* रुबाब व ब्राह्मणांचा थाटमाट यांच्या मिरवणुकी
लालसेच्या उरांत अग्निकुंडे लपवून पसार झाल्या
अज्ञानाच्या ऐसपैस सावल्या
अंधश्रद्धांचा काळोख गाढ करीत गेल्या
गोऱ्या जमातीच्या लबाड व्यापाऱ्यांची टोळकी
लबाडी व फसवाफसवीची आपली दुकाने सजवून गेली
पराभूत झालेल्या राजकीय भिकाऱ्यांचे तांडे
अदबीने, निष्प्राण माना खाली घालून गेले

---

* शेख — मुस्लिम धर्मगुरू.

दुःखात चूर झालेले प्रवासी, थकलेले यात्रिक
आत्म्याचे दीपक विझवून, हृदयाची कमळे मिटवून गेले
हा आहे मानवाचा मार्ग – जीवनाचा राजमार्ग
हजारो वर्षांचे प्रचंड ओझे शिरावर घेऊन
उभा आहे
नव्या क्षितिजावरून नवे काफिले येत आहेत
कालरूपी दिव्याची रंगीत ज्योत त्यांनी मोठी केली आहे
वंडाच्या सेना, क्रांत्यांची लष्करे
जमिनीवर पाय आणि आकाशावर नजर
रोखून पुढे चालत आहेत
विजयोन्मादाचे झेंडे वाऱ्यावर फडकावीत
दृढनिश्चयाचे ध्वज उंच धरून ती चालली आहेत
तळहातांवर घेऊन चंद्र आणि सूर्य
काखोटीस पृथ्वीचा सुंदर गोल
उठा आणि या काफिल्यामध्ये सामील व्हा
वेगवेगळे मुक्काम मागे टाकीत पुढे चाललेल्या
तांड्यात सामील व्हा
देशासाठी लढणाऱ्या हे योद्ध्यानो, पुढे पुढे चालत राहा
होय, हे देशभक्त, हे योद्ध्यांनो
पुढे पुढे चालत राहा

२८ डिसेंबर १९४६

Printed at Shivam Offset Press, A-12/1 Naraina Indl. Area, Phase-I, New Delhi-110 028